# नवभारत

मार्च - २०१६

- विज्ञानातील केऑस थिअरी
- शेती, शेतकरी व शासन
- व्यक्ती, प्रसंग आणि आठवणी : हिंदू सभेची संध्याकाळ व जनसंघाची सकाळ
- शोकात्म जीवन आणि सामंजस्य - २
- जुने लेखन

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६९ । अंक ६। मार्च २०१६
माघ/फाल्गुन शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## मार्च २०१६

## अनुक्रमणिका

# विज्ञानातली केऑस थिअरी

अशोक कृष्णाजी जोशी

विसाव्या शतकात विज्ञानात फार मोठी क्रांती झाली याबद्दल सर्वांचे एकमत आहे. इथे आपण विज्ञानाची एक महत्त्वाची असलेली शाखा पदार्थविज्ञान – म्हणजेच फिजिक्समध्ये या काळात काय काय महत्त्वाचे घडले, याचा अगदी थोडक्यात आढावा घेऊ व पदार्थविज्ञानातील अलीकडेच मांडल्या गेलेल्या केऑसच्या सिद्धान्तावर थोड्या विस्ताराने विचार करू. असे करताना विज्ञानातली केऑस थिअरी किंवा जेम्स ग्लिकचे (James Gleick) Chaos : The Amazing Science of the Unpredictable हे गाजलेले पुस्तक समोर ठेवून ह्या सिद्धान्ताचा विचार इथे करू.

केऑस थिअरीसंबंधात ज्यांचा विचार करावा लागेल अशाच २० व्या शतकातील पदार्थविज्ञानातील सिद्धान्तांचा व घटनांचा विचार इथे करू.

(१)

१. रूदरफोर्डने १९११ मध्ये अणू या पदार्थाच्या सर्वांत सूक्ष्म असणा-या घटकाचे क्षेत्र किंवा फिल्ड शोधले व अणूचे विभाजन केले.

२. नील्स बोर (Niels Bohr) याने अणू हा इलेक्ट्रॉनचा एक ढगच असतो व ते इलेक्ट्रॉन इलेक्ट्रोमॅग्नेटिक शक्तीमुळे अणुकेंद्राला वेढून असतात, असे शोधून काढले.

३. पार्टिकल्सच्या खाली एक प्रकारचा क्वांटम फेस असतो, त्याला (इतर गोष्टींशी) वस्तुजाताशी क्रियाप्रतिक्रिया करता येते; पण त्या क्वांटम फेसला संरचना–स्टक्चर्स–तयार करता येत नाहीत.

४. गुरुत्वाकर्षण (ग्रॅविटी) व गतिवृद्धी यांतला फरक वस्तुजात (मॅटर) जाणत, ओळखत नाही.

५. दृश्य विश्वातली स्थिर पार्टिकल्स एकमेकांना जोडली जाऊन अवकाश (स्पेस) व काळ (टाइम) बनतात, असे शोधले गेले.

६. पार्टिकल्सच्या खाली एनर्जी फोम (शक्तीने भरलेला फेस) असतो. त्याला स्थिरता नसते व तो इतर कशाशी जोडला गेलेला नसतो, हा शोध नंतर लागला.

७. पार्टिकल्स नेहमीच मॅटर व अँटिमॅटर या जुळ्या स्वरूपातच अस्तित्वात असतात असे शास्त्रज्ञांना आढळले.

८. विश्वातली प्रत्येक गोष्ट क्वांटम पार्टिकल्स किंवा कणांपासून बनलेली असते.

९. क्वांटम पार्टिकल्स (किंवा सूक्ष्म कणांचा) वेग (स्पीड) व ते असलेले ठिकाण (लोकेशन) नक्की ठरवता येत नाही. त्या स्थानाविषयी अनिश्चता असतेच.

१०. या क्वांटम पार्टिकल्सचा प्रवास/प्रवाह चान्स वेव्ह/श्रोडिन्गर वेव्हमार्गाने म्हणजेच यदृच्छ्या होत असतो.

११. एका क्वांटम पार्टिकलचा म्हणजेच एका सूक्ष्म कणाचा प्रवास दुस-या कणाच्या प्रवाहाला अडथळा होऊ शकतो. पण ते कसे होते याचे काही नियम आहेत. कणांच्या त्या प्रवाहात/प्रवासात एक संगती असते.

१२. या प्रवासात क्वांटम टर्नलिंग (क्वांटमचा एक बोगदा) होऊन पार्टिकल्स बारीक होऊन (झिप होऊन) त्या बोगद्यातून प्रवास करतात. मग ती पार्टिकल्स कुठेतरी दुसरीकडे वर येतात/प्रगटतात. म्हणजेच एका कणाचा प्रवास दुस-या कणाच्या प्रवाहाला अडथळा होऊ शकतो. पण ते कशा रीतीने होते, हे स्पष्ट नसते.

१३. क्वांटम ॲटम्सपासून मॉलिक्युल्स तयार होतात व नंतर वस्तुजाताची–ऑबजेक्ट्स–निर्मिती होते. या क्रमाने विश्वात वस्तू अस्तित्वात आल्या आहेत.

१४. स्वातंत्र्य हे विश्वाचे मूलभूत तत्त्व आहे.

ह्या गोष्टी केऑस सिद्धान्त मांडण्याच्या आधीच मांडण्यात आल्या होत्या. विश्वरचना कशी झाली असावी, यासंबधीही ब-याच काही कल्पना केऑस सिद्धान्ताआधी मांडण्यात आल्या होत्या व महत्त्वाचे संशोधनही आधी झाले होते. जे शास्त्रसिद्ध विचार आधी मांडले गेले होते, त्यांचा आढावा घेतल्यास आढळते की, विश्वरचनेच्या आरंभीच्या काळात विश्व एकरूपच होते. मग विश्वाची ही एकता

अनुक्रमणिका

भंगली. वेगवेगळ्या भागांचा समतोल बिघडला आणि वेगवेगळ्या शक्तींचे व पार्टिकल्स वा कणांचे स्वतंत्र अस्तित्व निर्माण झाले. जगात ४ शक्ती अस्तित्वात आल्या– अ) गुरुत्वाकर्षण, ब) विद्युत्‌चुंबकीय शक्ती (इलेक्ट्रोमॅग्नेटिझम), क) अतिशय मोठी अशी आण्विक शक्ती (स्ट्रॉग न्युक्लिअर) व ड) कमी शक्तीची आण्विक शक्ती (वीक न्युक्लिअर फोर्स) या ४ शक्ती निर्माण झाल्या.

त्यानंतर ३ मूलभूल स्वरूपाची पार्टिकल्स तयार झाली. १) क्वार्क्स, २) लेप्टॉन्स, ३) बोझन्स.

–ही तीनही प्रकारची पार्टिकल्स वा कण गुरुत्वाकर्षण या शक्तीला मानतात; म्हणजेच गुरुत्वाकर्षण-शक्तीला धरून ती पार्टिकल्स असतात.

–विद्युतभारित पार्टिकल्स इलेक्ट्रोमॅग्नेटिझमचे म्हणजेच विद्युत्‌चुम्बकीय शक्तीचे नियम पाळतात, तर न्यूट्रल असणारी पार्टिकल्स विद्युत्‌चुंबकीय शक्तीचे नियम पाळत नाहीत.

–सर्व क्वार्क्स व क्वार्कसंयुगे कमी शक्तीच्या न्युक्लिअर फोर्सचे नियम पाळीत असतात, तर सर्व लेप्टॉन्स त्या शक्तीचे नियम पाळीत नाहीत.

सर्व क्वार्क्स अधिक शक्तीच्या न्युक्लिअर फोर्सचे नियम पाळतात, तर सर्व लेप्टॉन्स ते नियम पाळीत नाहीत.

यांशिवायही विश्वरचनेसंबंधी अनेक गोष्टी केऑस थिअरीच्या आधीच शोधल्या गेल्या होत्या.

(२)

विश्वरचनेसंबंधीचे वेगवेगळे सिद्धान्त असे सांगतात की, विश्व तयार झाल्यानंतरही विश्वात स्फोट होतच राहिले. विश्वरचनेचे मूलभूत घटक असणा-या पार्टिकल्समध्ये अस्तित्वासाठी युद्धेच झाली. काही पार्टिकल्सना उपासमार किंवा दुष्काळसदृश परिस्थितीलाही तोंड द्यावे लागले. जड किंवा वजनदार पार्टिकल्स या युद्धात हरली व पार्टिकल्सचे 'युद्ध' थांबल्यानंतर वजनाने कमी असणा-या पार्टिकल्सनी प्रथिने किंवा प्रोटॉन बनवले. पार्टिकल्सची युद्धे थांबल्यावर, शांतता प्रस्थापित झाल्यावर पार्टिकल्समध्ये अशी देवाण-घेवाण होऊ शकली. मग काळ व अवकाश सुरू होऊन इतिहास घडणे शक्य झाले.

एलेक्ट्रोमॅग्नेटिझम किंवा विद्युत्‌चुंबकीय शक्तीमुळे प्रोटॉन्सना संलग्न असणारे इलेक्ट्रॉन्स एकत्र येऊन वस्तुजात निर्माण झाले, विश्व पारदर्शी स्वरूपात अस्तित्वात आले व पार्टिकल्सपेक्षा मोठ्या असलेल्या वस्तू जन्माला येणे शक्य झाले. विश्वात एकसारखा आकार असणा-या वस्तू निर्माण झाल्या. त्या एकसारख्या दिसणा-या वस्तूंच्या आकारात थोडा बदल होऊन विविधता तयार झाली. वस्तुनिर्मितीच्या विविधतेमुळे व जटिलतेमुळे पार्टिकल्सना तशी जटिलता व विविधता निर्माण करण्याचे स्वातंत्र्य मिळाले होते, असे दिसते. विविधता असलेली पृथ्वीवरील सृष्टी अशी तयार झाली असावी, असे पदार्थविज्ञान मांडते.

विश्वामध्ये चल-डायनॅमिकल किंवा नॉन लिनिअर-व्यवस्था व अचल–स्टॅटिक किंवा लिनिअर–व्यवस्था असतात हे पदार्थविज्ञान मानते; तसेच गणितशास्त्र पण हे मानते. अचलव्यवस्था नियमबद्ध व नियमित असतात, तर चलव्यवस्था नेहमीचे नियम पाळीत नाहीत व त्या निश्चित स्वरूपाच्या–डिटरमिनिस्टिक– नसतात. चलव्यवस्थांच्या इनपुटमध्ये व आउटपुटमध्ये फरक पडतो व तो फरक बदलणा-या घटकांमुळे–व्हेरिएबल्स--पडत असतो. अशा रीतीने चलव्यवस्था जटिल स्वरूपाच्या व गुंतागुंतीच्या बनलेल्या असतात.

आपल्याला नेहमी अनुभवास येणा-या व्यवस्था ब-याच वेळा यांत्रिक स्वरूपाच्या, निश्चित व नियमबद्ध असतात. उदाहरणार्थ, विहिरीतले पाणी वर काढण्याची कप्पी घेतली, तर आपल्याला आढळते की तिचे गरगरणे, फिरणे यांत्रिक स्वरूपाचे असते. त्यात एक निश्चितता व नियमबद्धता आढळते. ती कप्पी जर दीर्घकाळ चालवली व तिचे अगदी सूक्ष्म निरीक्षण केले, तर तिच्या गरगरण्यातला, फिरण्यातला, हालचालीतला सूक्ष्म फरक लक्षात येतो. तिची अनियमित हालचाल लक्षात येते. मग ती एक चलव्यवस्था आहे, हे आपल्याला समजते.

आणखी मोठे व सहज लक्षात येणारे उदाहरण ग्रह-ता-यांच्या हालचालीचे किंवा त्यांच्या अनियमित स्वरूपाच्या कक्षेचे आहे. जीवसृष्टीतही अशीच अनियमितता व अनिश्चितता आढळते. इलेक्ट्रॉनिक

सर्किट पण असेच दाखवते. त्यातील अचलता, अनियमितता, बदल आपल्या अनुभवाचे आहेत.

केऑस थिअरी चलव्यवस्थांच्या अनियमिततेला, अनिश्चितेला स्पष्ट स्वरूपात मांडते. फेज स्पेस ही केऑस थिअरीआधी मांडलेली कल्पना केआस थिअरीला आधार देणारी ठरली आहे. १९ व्या शतकाच्या अखेरीस Ludwing Boltzmann, Henri Poincare, William Gibbs या शास्त्रज्ञांनी phase space ही कल्पना मांडली. उदाहरण म्हणून कोठलाही गॅस किंवा वायू घेतला तर असे दिसते की, त्या वायूला लांबी, रुंदी, खोली ही तीनच परिमाणे नसतात, तर त्या वायूला अनेक परिमाणे असतात. तो वायू अनेक दिशांनी अवकाश व्यापत असतो, अनेक दिशांनी तो पसरतो. त्याची व्याप्ती व गती–पोझिशन्स व मोमेंटम–वेगळीच असते. त्याचा अवकाशच वेगळा असतो. धबधब्याचे पडणारे पाणी, हवेचे झोत, खवळलेला समुद्र, पक्ष्यांचे उडणे, ॠतूंचे बदल या व अशा प्रकारच्या गोष्टी अनियमित, अनिश्चित स्वरूपाच्या असतात.

लंबकाचे हलणे माणसाला फार पूर्वीपासून माहीत आहे. झोका दिलेल्या लंबकाने न थांबता फिरत राहिले पाहिजे, असे आपल्याला वाटते. पण तसे होत नाही. झोका दिलेल्या लंबकाची हालचाल थांबते व तो स्थिर अवस्थेत, थांबलेल्या अवस्थेत एका बिंदूला येतो. या बिंदूलाच ऍट्रॅक्टर असेही म्हटले जाते.

निसर्गात दिसणा-या या वैविध्यतेचा, अनियमिततेचा, अनिश्चिततेचा, अभ्यास विसाव्या शतकात केला गेला. त्यातूनच केऑस थिअरी जन्माला आली.

(३)

केऑस सिद्धान्त १९७० च्या दशकातला सिद्धान्त आहे. हा सिद्धान्त मांडला जाण्यापूर्वी पदार्थविज्ञानात ब-याच घटना घडल्या होत्या. पार्टिकल फिजिक्स. क्वांटम फिजिक्स, रीनॉर्मलायझेशन ग्रुप थिअरी, डायनॅमिक व नॉन लिनिअर स्ट्रक्चर्स या गोष्टी विसाव्या शतकातल्या सातव्या दशकाआधी म्हणजे केऑस सिद्धान्त मांडला जाण्यापूर्वी अस्तित्वात आल्या होत्या. त्यांपैकी काहींचा सरळ संबंध केऑस थिअरीशी येत होता, तर काही अप्रत्यक्ष रीत्या केऑस सिद्धान्ताशी संबधित होत्या.

केऑस सिद्धान्ताची पार्श्वभूमी म्हणून ५ संकल्पना व मांडेलब्रॉट सेट समजून घेणे इथे आवश्यक आहे.

नॉन लिनिअर या संकल्पनेचा प्रथम अर्थ स्पष्ट करू.

निसर्गात सर्वसाधारणपणे नियमितता–लिनिॲरिटी- आढळते; पण काही गोष्टी नियमित स्वरूपाच्या नसतात हे पण आपण पाहतो. उदाहरणार्थ, एखादा द्रवपदार्थ घेतला तर दिसते की, त्याचा आकार निश्चित नसतो. विविध संदर्भात त्याची विविध रूपे होतात. त्या द्रव पदार्थाला जर उष्णता दिली तर त्याचा गरम भाग द्रवाच्या पृष्ठभागाकडे जातो, तर थंड भाग भांड्याच्या तळाकडे येत असतो. द्रवाची या वेळी होणारी हालचाल नियमबद्ध वा नियमित नसते. त्या द्रवाचा आकार वा रूपही निश्चित नसते.

आणखी एक उदाहरण पाणचक्कीचे घेता येईल. पाणचक्कीची हालचाल, तिचे मागेपुढे होणे एका नियमित गतीने होत असते. घर्षण व हवेचा पाणचक्कीच्या फिरण्याला होणारा विरोध यामुळे ही हालचाल अनियमित स्वरूपाची होते. पाणचक्कीचे स्वरूपच जटिल किंवा कॉम्प्लेक्स बनते.

ही आकाराची अनियमितता व पाणचक्कीच्या फिरण्याच्या अनियमित गतीचे तसेच उष्णता दिलेल्या द्रवपदार्थाच्या हालचालीचे गणिती व शास्त्रीय स्पष्टीकरण मिळणे आवश्यक होते.

केऑस थिअरीने ते काम केले.

२) चलव्यवस्था ही या संदर्भातली दुसरी महत्त्वाची संकल्पना आहे. चलव्यवस्था किंवा डायनॅमिकल सिस्टम्स या स्थिर नसतात. त्यांना स्थिर रूप, निश्चित आकार नसतो. माणसांची वेगवेगळी असणारी रोगप्रतिबंधकारक शक्ती, पावसाचे येणे, वादळे, बर्फाचे अनंत आकार, आकाशस्थ ग्रहांचे मार्ग, विजेची सर्किट्स, उत्क्रांतीत घडणारे बदल ही चलव्यवस्थांची काही उदाहरणे म्हणून देता येतील.

केऑस थिअरी या चलव्यवस्थांच्या संदर्भात सिद्धान्त मांडते.

३) फेज स्पेस ही तिसरी महत्त्वाची संकल्पना आहे. नेहमीच्या अवकाशापेक्षा–स्पेसपेक्षा–फेज स्पेस

वेगळी असते. फेज स्पेस हा अनियमित, अनिश्चित स्वरूपाचा अवकाश असतो. नेहमीच्या अवकाशातल्या वस्तूंना निश्चित आकार असतो. त्या अवकाशालाही काही निश्चित आकार असतो. पण फेज स्पेस या अवकाशाला काही निश्चित आकार नसतो.

मळलेल्या कणकेला जसा नक्की आकार नसतो, त्या कणकेच्या गोळ्याला जसा हवा तसा आकार देता येतो, तसे फेज स्पेसच्या आकारांबाबत असते. प्रवाही द्रव, वायू, झाडांची विविध आकारांची व विविध अंतरांवरची पानरचना, ढग या वस्तूंचे आकार निश्चित स्वरूपाचे नसतात.

मार्कस या शास्त्रज्ञाने गुरू या ग्रहावरच्या लाल डागांचा अभ्यास जेव्हा केला, तेव्हा त्याला माहीत होते की, गुरू हा एक फिरता वायुगोळा आहे. त्याला निश्चित आकार नाही. तो फिरत असल्यामुळे त्याचा आकार स्थिर व नियमित वाटतो. हे लाल डाग अल्पजीवी असतात. कधी ते दिसतात, तर कधी दिसत नाहीत. गुरूग्रहाच्या विशिष्ट भागाच्या बदलणा-या उष्णतेशी ते संबंधित आहेत, हे मार्कसप्रमाणे इतर वैज्ञानिकांनाही मान्य झाले. गुरूग्रह हे फेज स्पेसचे उदाहरण मानता येते.

फेज स्पेस हा अवकाश वेगळा अवकाश असतो. त्यातील व्यवस्था स्थिर व्यवस्था नसते. ती चलव्यवस्था किंवा डायनॅमिक व्यवस्था असते. अशा व्यवस्था केऑस थिअरीने स्पष्ट होऊ शकतात.

४) फ्रॅक्टल्स ही केऑस थिअरीशी संबंधित चौथी संकल्पना आहे. बेनॉ मांडेलब्रॉटने (Benoit Mandelbrot) याने १९७५ साली फ्रॅक्टल्स या संकल्पनेचा वापर केला. फॅक्टल हा लॅटिनवरून आलेला शब्द असून त्याचा अर्थ तोडमोड झालेला– फ्रॅक्चर्ड– असा होतो.

केऑस थिअरीसंबधात त्याचा अर्थ कधीही न संपणारा, जटिल स्वरूपाचा, एकसारख्या एक अशा संरचना निर्माण करणारा, पुनःपुनः होणारा अनुबंध असा होतो.

निसर्गाकडे नीट पाहिले तर झाडांच्या व पानांच्या रचनेत तो आढळतो. तो अनुबंध किंवा पॅटर्न पुररावृत्त होत असतो. एका अनुबंधात दुसरे अनुबंध अशी ब-याचदा त्याची रचना असते. झाडांच्या रचनेत हे जसे आढळते, तसे बर्फ, ढग, डोंगर इत्यादींच्या अनियमित स्वरूपाच्या, अनिश्चित स्वरूपाच्या घडणीत हेच अनुभवास येते. मांडेलब्रॉट ने 'फ्रॅक्टल जिऑमेट्री ऑफ नेचर' हे पुस्तक लिहिले व या अनियमित आकारांची भूमितीच वेगळी आहे, असा दावा केला. सुरुवातीला इतर शास्त्रज्ञांना हा दावा मान्य झाला नाही; पण लवकरच त्यातले सत्य त्यानी मान्य केले. फ्रॅक्टल जिऑमेट्रीमुळे व फ्रॅक्टल शेप्स या कल्पनेमुळे शास्त्रज्ञांची बरीच निरीक्षणे स्पष्ट करणे शक्य झाले आहे, हे त्यांच्या लक्षात आले. ही वेगळ्या प्रकारची भूमिती काही न स्पष्ट झालेल्या गोष्टींचे स्पष्टीकरण देत होती. डिसऑर्डरमध्ये ऑर्डर पाहत होती. शास्त्रज्ञांच्या निरीक्षणात एक नियमबद्धता आणत होती. फ्रॅक्टल ही कल्पना सामान्य निरीक्षणांना पुष्टी देत होती.

५) एंट्रपी ही न्यूटन या जगप्रसिद्ध शास्त्रज्ञाच्या थर्मोडायनॅमिक्स नियमांपैकी दुस-या नियमात मांडलेली संकल्पना आहे. (आज तिचा जास्त वापर इन्फर्मेशन थिअरीमध्ये होतो)

एंट्रपी या संकल्पनेनुसार विशिष्ट चौकटीपासून/ अनुबंधापासून वेगळी झालेली/ अलग झालेली कोणतीही व्यवस्था (आयसोलोटेड सिस्टम) व्यवस्थेकडून अव्यवस्थेकडे (ऑर्डरकडून डिसऑर्डरकडे) जात असते आणि अव्यवस्था सतत वाढतच जाते.

पण हा एंट्रपीचा नियम सर्जनशीलतेचे कोणतेही स्पष्टीकरण देत नाही. साध्या ॲमिनो ॲसिडपासून अतिशय जटिल अशा गोष्टी विश्वात कशा निर्माण झाल्या, हे कोडे उलगडतच नाही. सूक्ष्म जीव, वनस्पती, प्राणी, मानवी मेंदू या जटिल गोष्टी ॲमिनो ॲसिडपासून कशा तयार झाल्या, हे थर्मोडायनॅमिक्समधली एंट्रपी ही संकल्पना सांगत नाही.

पाण्याचे बर्फ बनत असताना जे विविध आकार बनतात ते बनण्याचे कारण तीन घटक आहेत, असे न्यूटननंतरच्या शास्त्रज्ञाना आढळले. १) सर्व दिशांनी पसरणारे पाणी, २) पाण्याच्या पृष्ठभागावरचा ताण, ३) पाण्याला दिल्या जाणा-या उष्णतेचे प्रसरण.

पाण्याचे बर्फामध्ये रूपांतर होत असताना अगदी लहान घटकदेखील मोठे बदल व परिणाम घडवून आणीत असतात हे शास्त्रीय जगाने उशिराने मान्य केले.

या ५ संकल्पनांशिवाय एक सिद्धान्तही केऑस थिअरीसंबंधात महत्त्वाचा आहे. तो म्हणजे मांडेलब्रॉटचा सिद्धान्त किंवा मांडेलब्रॉट सेट.

मांडेलब्रॉट हा गणितज्ञ होता. त्याने सरळपणा किंवा साधेपणा व निरावयता (सिम्प्लिसिटी) आणि व्यामिश्रता (कॉम्प्लेक्झिटी) यांच्या संबधाविषयी एक समीकरणच तयार केले. त्याला मांडेलब्रॉट सेट म्हणतात.

मांडेलब्रॉटने एक प्रकारचा नकाशा, आकृती, रेखाटन केले. त्या रेखाटनाच्या मध्यभागी एक चकती (डिस्क) होती. त्या रेखाटनाच्या उजव्या व डाव्या बाजूला विविध आकारांच्या अनेक रेषा काढल्या होत्या. मांडेलब्रॉटला त्या आकृतीत एक श्रेणीव्यवस्था (हायरार्की) आढळली. अधिक सूक्ष्मपणे पाहिल्यावर त्याला त्या आकृतीत अणू व त्या अणूंमधले अनंत सूक्ष्म अणू दिसले. आकृतीतल्या चकत्यांना जिथे छेद (इंटरसेक्ट) मिळत होता, तिथे त्याला दुस-या लहानलहान चकत्या दिसल्या. त्या चकत्यातल्या दिसण्यातली नियमितता पण त्याच्या लक्षात आली. (आता चकत्यांच्या तशा दिसण्याला फेनबॉम सीक्वेंस ऑफ बायफरकेशन असे म्हणतात.)

मांडेलब्रॉटला असेही दिसले की, नीट पाहिल्यावर ती आकृती स्पष्ट दिसण्याऐवजी अधिक धूसरच दिसत होती. (मेसीअर दिसत होती.) मुख्या बेटापासून संथपणे दूर जाणा-या भूखंडांप्रमाणे किंवा बेटांप्रमाणे त्याला ती आकृती दिसत होती. त्या आकृतीमध्ये त्याला लहान-लहान बेटांची एक शृंखलाच असलेली दिसली. एखाद्या समुद्री घोड्याच्या (सी हॉर्स) आकाराचे ते चित्र होते.

ही आकृती, हा मांडेलब्रॉट सेट संचातले वेगवेगळे बिंदू जोडून तयार झाला होता. त्या संचाचा कोणताही एक भाग दुस-या भागासारखा नव्हता. संचातल्या दोन घटकांत मोकळी जागा (गॅप) दिसत होती. पण संचाचे घटक भाग एकाकी दिसत नव्हते. ते जोडीनेच त्या संचात उपस्थित होते. संच आपल्या विवेकबुद्धीला (रॅशनॅलिटी) अतर्क्याचा (इर्रॅशनॅलिटीचा) आधार देत होता.

गणिती भाषेत मांडेलब्रॉटने हे दृश्य मांडले. $Z \longrightarrow z^2 + L$ मांडेलब्रॉटने आता फ्रॅक्टल जेओमेट्री या नव्याच भूमितीचा शोध लावला होता. फ्रॅक्टल जेओकेट्री आता जन्माला आली होती. या पूर्वी फ्रॅक्टल जेओमेट्रीची शक्यता गॅस्टन जुलिआ.........व पिअरे फॅटु.........या दोन फ्रेंच गणितज्ञांनी वर्तवली होती. त्यानी कम्प्युटरचा वापर संशोधनात होण्यापूर्वी ज्युलिआ सेट.....म्हणून प्रसिद्ध असलेल्या सिद्धान्ताद्वारे हे भाकित केले होते. ते वास्तवात आणण्याचे काम मांलब्रॉटने केले व कम्प्युटरच्या च्या साहाय्याने त्याची वैधला तपासली. अस्पष्ट स्वरूपात दिसणा-या आकारातून वास्तव जन्माला येते, हे त्याने सिद्ध केले. साधेपणातून जटिल गोष्टी निर्माण होत असतात, हे त्याने गणित व कंम्प्यूटरचा उपयोग करून स्पष्ट केले. सिंप्लिसिटी ब्रीड्स कॉम्लेक्झिटी हे तत्त्व त्याने उचलून धरले.

आपल्या संचात कोणता बिंदू असेल व कोणता बिंदू सेटबाहेर असेल, यासंबंधी त्याने एक समीकरणच तयार केले. त्याने दृश्य आकारांना संख्यांशी ........जोडले. हा वेगळा प्रयत्न होता. मांडेलब्रॉट सेट, डायनॅमिकल सिस्टम किंवा चलव्यवस्था हा मुख्य झोत किंवा फोकस असलेल्या केऑस थिअरीला उपयोगी झाला.

केऑस थिअरी मांडणा-या सैद्धान्तिकांची आपण क्रमवारी लावू शकतो.

प्रथम लॉरेंझ या केऑस थिअरीचा मुख्य प्रणेता असलेल्या सैद्धान्तिकाचा विचार करणे योग्य होईल.

एड्वर्ड लॉरेंझ (Edward Lorenz) (23 May 1917 to 16 April 2008) या अमेरिकन गणितज्ञाने व हवामानशास्त्रज्ञाने केऑस थिअरीची नीट मांडणी केली. त्याला केऑस थिअरीचा जनक मानण्यात येते. इनपुट-मध्ये अगदी लहानसा बदल झाला, तर आउटपुटमध्ये फार मोठ्या प्रमाणात बदल होऊ शकतो व हा बदल नियमबद्ध व निश्चित स्वरूपाचा नसतो (म्हणजे नेहमीच्या नियमांप्रमाणे तो नसतो), असे त्याचे निरीक्षण होते व तेच केऑस थिअरीचे मूलतत्त्व मानले गेले आहे.

केऑस सिद्धान्त ही गणिताची एक उपशाखा आहे. त्या उपशाखेत जटिल प्रश्नांचा (कॉम्प्लेक्स सिस्टम्सचा) विचार करण्यात येतो. उदाहरणार्थ, हवामान, उकळते

पाणी, पक्ष्यांचे हिवाळ्यात होणारे स्थलांतर, वेगवेगळ्या ठिकाणी असणारी झाडेझुडपे, पिके व वनस्पती आणि प्राणी हे सर्व जटिल गोष्टींतच मोडतात. ह्या जटिल गोष्टी स्थिर स्वरूपाच्या नसतात. त्यांचे रूप बदलत असते. त्या चलव्यवस्था असतात.

पदार्थ विज्ञानातल्या क्वांटम सिद्धान्ताने निसर्गातली ही चलता ओळखली व तिथेच पदार्थविज्ञानातला निश्चिततावाद संपला. निसर्गाची चलता ओळखणे ही माणसाच्या ज्ञानातली मोठी झेप होती. केऑस सिद्धान्ताने हे केले, म्हणूनच केऑस सिद्धान्त महत्त्वाचा ठरला.

केऑस सिद्धान्ताने क्वांटम सिद्धान्ताच्या पुढचे पाऊल टाकले. निसर्गातली सकृद्दर्शनी दिसणारी अनियमितता नियमबद्ध असते व असे नियमबद्ध असणे हे सर्व चलव्यवस्थांचे व्यवच्छेदक लक्षणच आहे, असे गणित व कंम्प्युटरचा आधार घेऊन/उपयोग करून या सिद्धान्ताने दाखवून दिले.

या सिद्धान्ताची सुरुवात एड्वर्ड लॉरेंझ या एम. आय. टी. विद्यापीठातल्या शास्त्रज्ञाच्या हवामानासंबंधीच्या कंम्प्युटर मॉडेलने १९६० साली झाली.

हवामानाचा अंदाज विज्ञानाला नेमकेपणाने करता येतो का, हा शास्त्रज्ञांना सतावणारा प्रश्न होता. त्याचे उत्तर शास्त्रज्ञ शोधीत होते. लॉरेंझ हा शास्त्रज्ञ आपले प्रयोग त्या दिशेने करीत होता. कंम्प्युटरवर काम करीत असताना त्याला आढळले की, इनपुटमध्ये लहानसा बदल केला, तर सर्व बदलूनच जाते. समोरचे मॉडेल आमूलाग्र बदलते. त्याला असेही आढळले की, ६ डेसिमल/दशांशापर्यंतचा हवामानाचा अंदाज खरा ठरतो. पण त्यापलीकडे गेले तर सर्व अनिश्चित असते. त्या वेळी अनियमितता वा अनिश्चिततेचे तत्त्व अमलात येते व नेमकेपणाला खिळ घातली जाते. जटिल व्यवस्थांच्या (कॉम्प्लेक्स सिस्टिम्स) बाबतीत हे अनियमितता व अनिश्चिततेचे तत्त्वच महत्त्वाचे ठरते. या जटिल वा कॉम्प्लेक्स व्यवस्थांत, चलव्यवस्थांत एक पॅटर्न आढळतो. घटना व घटिते चक्राकार गतीने घडत असतात, ती व्यवस्था एक समतोल (इक्विलिब्रिअम) साधायचा प्रयत्न करीत असते. समतोल साधायच्या या प्रयत्नाला, एका ठरावीक बिंदूपाशी व्यवस्था परत येण्याच्या या प्रयत्नाला आकर्षणबिंदू (अॅट्रॅक्टर) असे म्हटले जाते.

हा समतोल जर चलस्वरूपाच्या गोष्टीसंबंधी असला, तर त्याला स्ट्रंज अॅट्रॅक्टर असे म्हटले जाते. लॉरेंझने कंम्प्युटरच्या मदतीने हवामानातल्या बदलांचा अभ्यास केला होता, हे आपण पाहिले आहे. तो अभ्यास करताना त्याला आढळले होते की, हवामानाचा अंदाज करताना कंम्प्युटर सहा दशांशापर्यंत अचूकता व नियमितता पाळतो. पण सहा दशांशांपलीकडच्या अभ्यासाचा प्रश्न जेव्हा येतो तेव्हा सहा दशांशांपलीकडे कंम्प्युटरने केलेले काम अनियमिता व अनिश्चितता दाखवते.

लॉरेंझने या घटनेला गमतीने बटरफ्लाय इफेक्ट असे म्हटले. एका जागी फुलपाखराने पंख हलवले तर दूरवर किंवा दूरच्या जागी त्याचा परिणाम म्हणून वादळ होते, असे तो (गमतीने) म्हणाला. भूमितीच्या पद्धतीची आकृती काढून त्याने हे स्पष्ट केले. भूमितीच्या साहाय्याने जेव्हा हे दाखवले जाते तेव्हा इंग्रजी आठच्या आकड्याची आकृती काढली जाते, ती आकृती फुलपाखरासारखी दिसते. इनपुट व आउटपुटमधल्या या फरकाला बटरफ्लाय इफेक्ट असे नाव लॉरेंझने दिले हे आपण पाहिले आहेच.

अंतर, आवाज व वेग हे तीनही घटक स्ट्रेंज अॅट्रॅक्टर (किंवा यालाच लॉरेंझ अॅट्रॅक्टर असे नाव नंतर लॉरेंझ बद्दलच्या कृतज्ञताभावनेने दिले गेले.) घडवतात. वरवर ज्या चलव्यवस्था कुठलाही नियम पाळत नाहीत असे दिसते, त्यांना नियम असतात, त्यांना एक निश्चितता असते, असे शास्त्रज्ञांना आढळले. उदाहरणार्थ, लंबकाला झोका दिल्यावर तो हलू लागतो. खरे म्हणजे स्थिर व्यवस्था असती तर त्या लंबकाला अडवणारा घटक नसताना त्याने हलतच राहिले पाहिजे होते. पण तसे होत नाही. हलणारा लंबक थांबतो. म्हणजे त्याला थांबवणारा, आकर्षित करणारा घटक असतो. शास्त्रज्ञ या घटकाला अॅट्रॅक्टर –आकर्षण बिंदू– म्हणतात. दुसरे उदाहरण, ता-यांच्या लंबवर्तुळाकार मार्गाचे घेता येईल. हा मार्ग लंबगोलाकार असला, तरी तो एका बिंदूभोवतीचा मार्ग असतो. त्याला एक निश्चित आकार, संरचना (पॅटर्न) असते. ते तारे एका निश्चित मार्गाने जात असतात. त्यांच्यात एक व्यवस्था असते. लॉरेंझने या वरवर दिसणा-या अव्यवस्थेमागची व्यवस्था व नियम दाखवले

म्हणून या आकर्षणबिंदूंना लॉरेंझ अॅट्रॅक्टर असेही म्हटले गेले.

लॉरेंझ हा मूलतः हवामानशास्त्रज्ञ होता. हवामानातली अस्थिरता, बदल त्याला माहीत होते. हवामानाचा अंदाज वर्तवणे कठीण काम असते, हे त्याच्या परिचयाचे होते. हवामानाची अनियमितता त्याला माहीत होती. सर्वसामान्य स्वरूपाचा हवामानाचा अंदाज वर्तवणे –अॅव्हरेज हवामान काय हे सांगणे –कठीण असते हे त्याच्या अनुभवाचे होते. कारण अॅव्हरेज काही वेळा अस्थिर व अनियमित असते, हे त्याला माहीत होते.

मिशेल फेनबॉम (Mitcell Feignebaum) हा केऑस थिअरीसंबंधित असलेला दुसरा महत्त्वाचा शास्त्रज्ञ आहे. मिशेल फेनबॉम हा तरुण शास्त्रज्ञ लॉस अलॉमॉस या प्रसिद्ध प्रयोगशाळेत काम करीत होता. आयुष्याच्या एका टप्प्यापर्यंत, केऑस थिअरी स्पष्ट करण्याचे काम करीपर्यंत, विज्ञानक्षेत्रात मोठे असे काही काम त्याने केलेले नव्हते. पण तो फार बुद्धिमान आहे, याची जाणीव त्याच्या सहका-यांना होती. त्या सहका-यांपैकी एक सहकारी हॅरल्ड ऍग्न्यू (हा ओपेनहायमर या सुप्रसिद्ध अणुशास्त्रज्ञाबरोबर काम करीत होता.) याने फेनबॉमला म्हटले की, तू एवढा बुद्धिमान आहेस तर लेसर फ्युजन कसे होते, यावर तू काम का करीत नाहीस व ते फ्युजन कसे होते, हा शास्त्रज्ञांना पडणारा प्रश्न का सोडवीत नाहीस? लेसर फ्युजनप्रमाणे अनेक शास्त्रीय प्रश्न अस्तित्वात असलेल्या सिद्धान्तांनी स्पष्ट करता येत नव्हते. उदाहरणार्थ, ढगांचे आकार, बर्फ होताना पाण्याचे बनणारे विविध आकार, सतत बदलणारे हवामान इत्यादींं मागची कारणमीमांसा या घटनांचे शास्त्रीय कारण सापडत नव्हते. ते सापडणे एक आव्हानच होते. आजवरच्या ज्ञात विज्ञानाने ते करता येत नव्हते. पण १९७० च्या दशकात शास्त्रज्ञांना या वरवरच्या अव्यवस्थेमध्ये व्यवस्था दिसू लागली होती, ती व्यवस्था त्यांच्या लक्षात येऊ लागली होती. त्या अवगुंठित व्यवस्थेला, स्पष्ट नसलेल्या अनेक गोष्टींना सिद्धान्तात बांधून सार्वत्रिकतेची जोड देणे आवश्यक होते. आजवर जे कल्पनेत होते, ते गणितात बांधणे आवश्यकच होते. तरच त्याला शास्त्रीय रूप येणे शक्य होते. फेनबॉमसारख्या तरुण प्रतिभावंताला (१९७४ साली त्याने जेव्हा लॉस अलॉमोस राष्ट्रीय प्रयोगशाळेत नोकरी घेतली, तेव्हा तो तिशीच्या आत होता.) ते आव्हान होते.

फेनबॉम प्रत्यक्ष प्रयोग करण्याऐवजी सैद्धांतिक भागावर अधिक लक्ष देई. त्याने आपले जे शोधनिबंध प्रसिद्ध करण्यासाठी पाठवले, ते एकतर योग्य वेळी प्रसिद्ध झाले नाहीत किंवा प्रसिद्धच केले गेले नाहीत.

त्याने नॉन-लिनिअर गोष्टींवर आपल्या अभ्यासात लक्ष केंद्रित केले होते. त्या नॉन-लिनिअर गोष्टींची सार्वत्रिकता त्याला सिद्ध करायची होती. त्याच वेळेला पिरीअड डबलिंग व इन्फिनिट कास्केडस ऑफ बायफर्केशन्स हे दोन सिद्धान्त शास्त्रज्ञांना उपलब्ध झाले होते.

या सगळ्या उपलब्ध सामग्रीचा उपयोग करून फेनबॉमने नॉन-लिनिअर गोष्टींची सार्वत्रिकता universality हा आपला सिद्धान्त मांडला. त्यातला सैद्धांतिक भाग कठीण स्वरूपाचा होता. पण ब-याच शास्त्रज्ञांच्या दृष्टीने तो भाग नवा होता. नवी दृष्टी देणारा होता.

माणसाच्या दृष्टीला अनेक गोष्टी पडत असतात. त्याला एक केऑसच पाहायला मिळत असतो. एक अनियमित, अव्यवस्था असलेले वास्तव त्याच्या दृष्टिपथात येत असते. त्यातून त्याचा मेंदू, त्याचे मन काही गोष्टी निवडत असते. अव्यवस्थेतली व्यवस्था मानवी मन पाहत असते. मानवी मन ते कसे करते, आपण पाहिलेल्या गोष्टी सर्वत्र असतील हे कशाच्या बळावर माणूस मानतो, हे जाणून घेण्यासाठी एका सिद्धान्ताची आवश्यकता होती.

जर्मन कवी गटे फेनबॉमचा आवडता कवी व तत्वज्ञ होता. जर्मन कवी गटेला रंगांचे ज्ञान होते, रंगनिर्मितीबद्दलचे गटेचे ज्ञान पक्के होते, याची फेनबॉमने प्रशंसा केली आहे. लाल रंग बॅंडविड्थशी संबंधित नसून विश्वातल्या केऑसशी व त्या वस्तूच्या सीमारेषांशी–बाउंडरीशी–तो निगडित असतो, हे फेनबॉमचे मत होते. यासंबंधीच्या गटेच्या मर्मदृष्टीचा प्रभाव त्याच्यावर होताच. निसर्गातल्या अनियमिततेला फेनबॉमने केऑस हे नाव दिले. पदार्थविज्ञान, गणित व इतर विज्ञानांचा नीट किंवा सम्यक विचार करून, त्यांचा एकत्रित स्वरूपात विचार करून

निसर्गातल्या अनियमिततेचा व निसर्गातल्या तथाकथित अव्यवस्थेचा विचार युरोप व अमेरिकेतले शास्त्रज्ञ १९७० च्या दशकात करू लागले होते, हे पण फेनबॉमच्या दृष्टीने महत्त्वाचे होते.

हा सिद्धान्त मांडल्यावर काही वर्षांनी त्याने एका वैज्ञानिक परिषदेच्या निमित्ताने अमेरिकेतील कॅलिफोर्निआ राज्यातील सांताक्रुझ कॅंपसला भेट दिली. त्या कॅंपस-वर उत्साही तरुण शास्त्रज्ञांचा व नॉनलिनिअर घटनांत रस घेणा-या डायनॅमिकल सिस्टम कलेक्टिव या गटाला त्याने फार प्रभावित केले. आजवर त्या गटाने नॉन-लिनिअर गोष्टींचा अभ्यास फेनबॉमने केलेल्या सार्वत्रिकतेच्या दाव्याला धरून केला नव्हता.

नॉन-लिनिअर गोष्टींची सार्वत्रिकता सिद्ध करण्यासाठी फेनबॉमने आधीचा मार्ग सोडून सोप्या अशा नॉन-लिनिअर इक्वेशन्सकडे वळणे पसंत केले. त्याच प्रयोगशाळेत केनेथ विल्सन हा वैज्ञानिक रिनॉर्मलायझेशन ग्रुप थिअरीवर काम करीत होता. निसर्गात जी वरवर अव्यवस्था व अनियमितता दिसते त्यात ब-याचदा सारखेपणा असतो, हे तो पाहत होता. या सारखेपणावर भर देऊन सार्वत्रिकता सिद्ध करणे व ही अनियमितता सार्वत्रिक स्वरूपाची आहे, नियमबद्ध आहे, हे सिद्ध करणे फार कठीण आहे, असे आजवर विज्ञानात समजले जात होते. गणिती पद्धतीने पण सोपा मार्ग समोर ठेवून ते दाखवणे शक्य आहे, असे विल्सनला जाणवले होते. फेनबॉमलाही तसेच वाटत होते.

लॉरेंझच्या केऑससंबंधीच्या स्पष्टीकरणाने हा जटिल प्रश्न सुटू शकत होता, असे त्या दोघांना वाटले. गणिताच्या आधारे, वैज्ञानिक स्पष्टीकरणाने तसे स्पष्ट करणे आवश्यक होते. लॉरेंझने थोडा प्रयत्न केला होताच. आता फेनबॉमही तसा प्रयत्न करू लागला.

फेनबॉम हा प्राणिशास्त्रज्ञही (तो गणितज्ञ होताच) होता. त्याला असे आढळले की, जैविक गोष्टी जेव्हा लहान होत जातात, तेव्हा त्या समजून घेणे कठीण होते. मेंदूमध्ये असंख्य गोष्टी असतात, मेंदू अनेक गोष्टी करत असतो, मेंदूला एक प्रकारची लवचीकता–फ्लेक्झिबिलिटी– असते. मेंदू एक प्रकारची व्यवस्था-ऑर्डर–निर्माण करतो. सार्वत्रिकतेशी–युनिवर्सलिटीशी--जोडून घ्यायची तो खटपट करीत असतो.

फेनबॉमने मानवी हृदयाचे ठोके, स्थलांतर करणारे कीटक व पतंगांसारखे कीटक किंवा मॉथ्स, खवळलेला समुद्र, ढगांचे बनत असलेले विविध आकार, आकाशात अचानक चमकणारी वीज, रक्तवाहिन्यांची गुंतागुंतीची रचना, आकाशातले तारकापुंज अशी अनेक उदाहरणे दिली व निसर्गात असलेले वैविध्य, निसर्गातली अनियमितता, अनिश्चितता स्पष्ट स्वरूपात मांडली. माणसाने तयार केलेल्या वस्तू–मेणबत्या, पेन्सिल, कांचावरही त्याने प्रयोग केले. ह्या प्रयोगात त्याला आढळले की, प्रकाश व छाया बदलली गेली की, वस्तूंचा रंगही बदलतो.

केऑस थिअरीसंबंधातला तिसरा महत्त्वाचा शास्त्रज्ञ लिबचाबेर (Albert Libchaber) हा आहे. फेनबॉम हा शास्त्रज्ञ सैद्धांतिक काम करणारा होता, तर लिबचाबेर एक प्रयोग करणारा शास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे.

१९७० च्या दशकात लिबचाबेरसह काही शास्त्रज्ञांना वाटले की, पदार्थाची हालचाल (मोशन) व पदार्थाचे सर्वांसमोर येणारे आकार (युनिवर्सल फॉर्म्स) या दोन्हीमध्ये काहीतरी संबंध आहे. ज्वाला व झाडे यांचा आकार अनियमित स्वरूपाचा असतो. पण तो अगदीच स्वैरही नसतो. काही नियमांनी तो आकार घडत असावा, अशी त्यांची धारणा होती.

लिबचाबेरला प्लेटो या प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञाचे मत विचार करण्यासारखे वाटत होते. प्लेटोने म्हटले होते की, या जगात सुप्त आकार भरलेले आहेत. आकार मर्यादित असतात. त्यांचा आविष्कार मात्र वैविध्यपूर्ण असतो. वस्तू आकार धारण करताना तीन अवस्थांमधून जातात. १) वेळ –टाइम– व अवकाश– स्पेस– यांतच त्या घडत असतात, आकाराला येत असतात. वेळ व अवकाश यांनी बद्ध असणारा तो प्रवाह–फ्लो–लॅमिनर स्वरूपाचा असतो. २) मग तो प्रवाह हलतो–ऑसिलोट होतो–, दुभंगतो व जटिल स्वरूप, व्यामिश्र स्वरूप–कॉम्प्लेक्स स्वरूप–धारण करतो. ३) तिस-या अवस्थेत तो प्रवाह–फ्लो–अनियमित, अधिक जटिल व केऑटिक बनतो.

लिबचाबेरचे हे मत होते. तो म्हणत होता की,

वस्तूंच्या वैविध्यपूर्ण आकारांमागे असणारे प्रमाण-स्केल, त्यांच्या आकारांतली समानता, सारखेपणा, त्यांचे पुनरावृत्त होणे हे नेहमीच्या डिफरेन्शिअल कॅल्क्युलस इक्वेशन्सनी सिद्ध करता येणार नाहीत. त्यांच्या वर्णनाकरिता वेगळ्या भाषेचा. काव्यभाषेचा वापर करावा लागेल.

प्रवाहापासून -फ्लोपासून– वस्तू कशा बनतात, कशा आकाराला येतात हे दाखवण्यासाठी त्याने एक प्रयोग केला. प्रवाहामध्ये आकार, बदल व गती ही तीन तत्त्वे असतात, असे तो मांडतो. त्याने एक भांडे घेतले, ते निर्वात करून तापवले, त्यात द्रवरूप हेलिअम वायू सोडला. मग त्यात एक कन्वेक्शन निर्माण झाले, एक टर्ब्युलन्स निर्माण झाला. गरम केलेला हेलिअम वायू पृष्ठभागावर येत होता व थंड हेलिअम तळाला जात होता. हे सगळे नेहमीसारखेच व पदार्थविज्ञानाच्या नियमाप्रमाणे घडत होते. पण मुख्य गोष्ट ही होती की, उष्ण हेलिअम पृष्ठभागावर येताना व थंड हेलिअम तळाला जाताना जे दोन आकार बनत होते, ते एखाद्या सिलिंडरसारखे होते. हे सिलिंडर बनणे आपोआपच घडत होते. लिबचाबेरने वेगळे काहीही केले नव्हते. त्या हेलिअम वायूचा समतोल–इक्विलिब्रिअम– साधला जात होता.

लिबचाबेरने त्या प्रयोगात एका साध्या पेन प्लॉटरची योजना केली होती. तो पेन प्लॉटर कागदावर रेघा काढीत असे. त्या भांड्यातल्या (परीक्षानळीतल्या) उष्णतेच्या हालचालीमुळे, बदलामुळे प्लॉटरने काढलेल्या रेषांचा आकार सतत बदलत होता. कधी रेषा उंचावत, तर कधी समुद्रातील लाटेसारख्या त्या बनत, कधी त्या खोल दरीसारख्या दिसत. रेषांच्या या आरेखनात एक निश्चित पॅटर्न–संरचना– त्याला दिसली. लिबचाबेरचा प्रयोग एखाद्या स्वप्नासारखा होता. त्याला जे आढळले, ते फारच विलक्षण होते.

हा प्रयोग करताना त्याला फेनबॉमच्या सार्वत्रिकतेच्या किंवा युनिर्वर्सलिटी या शोधाची व त्याच्या सिद्धान्ताची माहिती नव्हती. लिबचाबेर व फेनबॉम या दोन शास्त्रज्ञांची भेट घडवण्याचे काम एका तिस-या शास्त्रज्ञाने– होहेनबर्गने केले ते १९७९ साली.

मग दुस-या शास्त्रज्ञांनी पिरिअड डबलिंग, इंटरमिटंसी व क्वासीपिरिऑडिसिटी या केऑस थिअरीशी संबंधित असणा-या संकल्पनांविषयी सिद्धान्तन व प्रयोग केले व या सिद्धान्ताची सत्यता पडताळली. हे करीत असताना त्यानी कंम्प्युटरचा वापर केला. आता बनणारे वैविध्यपूर्ण आकार कंम्प्युटरवर पाहता येत होते, त्यांचे मोजमाप पण घेता येत होते, ते पुनःपुनः निर्माण करून त्यांची सत्यता, समृद्धता पडताळता येत होती. केऑस थिअरीचा पडताळा घेता येऊ लागला.

फेनबॉमची व सांताक्रुझ कँपसमधल्या डायनॅमिकल सिस्टम कलेक्टिव या शास्त्रज्ञांच्या समूहाची भेट झाल्याचे व सिद्धान्त मांडणारा शास्त्रज्ञ व हे तरुण शास्त्रज्ञ यांच्यात बौद्धिक देवघेव झाल्याचे आपण पाहिले आहेच.

या डायनॅमिकल सिस्टम ग्रूपचे केऑस थिअरी-संबंधातले काम महत्त्वाचे ठरले आहे. या उत्साही समूहात रॉबर्ट शॉ, स्पिगेल, डायेन फार्मर, फोर्ड हे मुख्य शास्त्रज्ञ होते व डायेन फार्मर हा समूहाचा अधिवक्ता– स्पोक्समन-- होता. व्यवस्था (ऑर्डर) व अव्यवस्था (डिसऑर्डर) या जरी परस्परविरोधी भासल्या तरी त्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत, असे हा समूह मानीत होता व या समूहाचा स्पोक्समन फार्मर मानत होता.

येणा-या काळात पदार्थविज्ञानात आजवर चालत आलेल्या पदार्थविज्ञानाबरोबरीने चलव्यवस्था–डायनॅमिक्स-- व नॉन-लिनिऑरीटीवर आधारलेले पदार्थविज्ञानही चालेल, अशी या समूहाची धारणा होती.

या समूहातील रॉबर्ट शो या शास्त्रज्ञाने आपला शोधनिबंध लगून बीच येथील कंडेन्सड फिजिक्स परिषदेत सादर केला. एका निमंत्रित वक्त्याच्या गैरहजेरीत त्याला ही संधी मिळाली होती. त्या संधीचे त्याने सोने केले व स्वतःबरोबरच आपल्या शास्त्रज्ञांच्या समूहाला प्रकाशात आणले. इन्फर्मेशन थिअरी व केऑस थिअरी यांना त्याने आपल्या निबंधात जोडले होते. त्या निबंधाच्या प्री-प्रिंटच्या स्वरूपात १००० प्रती शास्त्रज्ञांत खपल्या.

त्या निबंधात रॉबर्ट शॉ ने फेज स्पेसमध्ये अॅट्रॅक्टर कसे अस्तित्वात असतात व त्याच्या स्थिर, चल व अॅट्रॅक्टर अशा तीन अवस्था (फेज स्पेसच्या) कशा क्रमाक्रमाने होतात, हे सांगितले होते.

शिवाय या निबंधात इंफर्मेशनसंबंधी शॉ ने असे

अनुक्रमणिका

मांडले होते की, माहिती-इन्फर्मेशन- लहान परिमाणांकडून (स्मॉल स्केल) मोठ्या परिमाणाकडे (लार्ज स्केल) जात असते. सुरुवातीला लहान वाटणारे घटक व रूपबंध नंतर मोठ्या रूपबंधांत रूपांतरित होतात. म्हणजे माहिती केवळ साठवली जात नाही, ती केवळ एका टोकाकडून दुसरीकडे पाठवली जात नाही; तर तिची निर्मिती होत असते. तिच्यामध्ये वेगवेगळ्या जोडण्या तयार होतात. अस्तित्वात नसलेल्या वेगवेगळ्या जोडण्या किंवा सिनॅप्सेस तयार होतात व त्यामुळे नवीन माहिती तयार होते.

प्रयोगाने हे सिद्ध करण्यासाठी रॉबर्ट शॉ ने उंचावर एका टबात पाणी ठेवले व ते तिथून खाली थेंबथेंब पडेल अशी रचना/व्यवस्था केली. ते पाणी पडत असताना जो आवाज होई, तो कागदावर प्लॉटर पेनच्या साहाय्याने नोंदण्याची व्यवस्थाही त्याने केली. शिवाय त्या पाण्यावर प्रकाशझोत टाकून त्याने निरीक्षण केले की, पाणी पडत असताना एक (फजी असा) बुडबुडा-ब्लॉब-तयार होतो.

वनस्पति शास्त्राने या केऑस थिअरीला पाठिंबाच दिला. ब-याच झाडांची रचना वैविध्यपूर्ण असते; पण फर्न या वृक्षाच्या रचनेत हे विशेषकरून दिसते. त्याच्या रचनेत वैविध्य दिसते व अनियमितताही दिसते. पण नीट पाहिले तर या अनियमिततेला व वैविध्याला मर्यादा असतात, असे दिसते. म्हणजे फर्नच्या फांद्या व पाने या स्वरूपांतच ही विविधता व अनियमितता वागते.

प्राणिशास्त्रातही केऑस सिद्धान्ताला पाठिंबा मिळतो. रॉबर्ट मे या प्राणिशास्त्रज्ञाने जेव्हा प्राण्यांच्या संख्येचा अभ्यास केला तेव्हा त्याला आढळले की, २, ४, ८, १६, ३२ असे नियमिततेचे चक्र साधारणपणे प्राणिसंख्येबाबत पाळले जाते; पण हे चक्र अव्याहतपणे चालू राहत नाही. अचानक हे चक्र तुटते व नियमितपणाऐवजी प्राणिसंख्येबाबतीत अनियमितता आढळू लागते, पण अनियमितता अल्पजीवी असते. नियमिततेचे चक्र पुनः सुरू होते. मे या प्राणी व जीवशास्त्रज्ञाने माशांची संख्या, साथीचे रोग यांचा अभ्यास हा डिटरमिनिस्टिक डिसऑर्डरचा सिद्धान्त समोर ठेवून केला. त्याला निरीक्षणात असे आढळले की, माशांच्या बदलत्या संख्येतही एक व्यवस्था किंवा नियमितता आहे. चार वर्षांचे एक चक्र (सायकल) त्याला आढळले. या चार वर्षांच्या परिमाणामध्ये सर्व बदल घडत असतात. नियमितता व अनियमितता यांचा खेळही एका सूत्रानुसार चालतो, असे त्याला दिसले. लॉरेंझच्या केऑस कल्पनेला रॉबर्ट मे चा प्रयोग समर्थनच देत होता.

विसाव्या शतकात तीन महत्त्वाच्या शास्त्रीय क्रांत्या झाल्या, असे मानले जाते.

१. रिलेटिविटीचा किंवा सापेक्षतेचा सिद्धान्त. आइनस्टाइनने हा सिद्धान्त मांडून काल व अवकाश हे घटक ॲबसल्यूट असतात ही न्यूटनची कल्पना अव्हेरली.

२. नियंत्रण राखून मोजमाप करता येते -कंट्रोलेबल प्रोसेस ऑफ मेझरमेंट- ही न्यूटनची कल्पना क्वांटम फिजिक्सने नाकारली.

३. केऑस थिअरी या तिस-या क्रांतीने ला प्लास या शास्त्रज्ञाची नक्की अंदाज बांधणे -डीटरमिनिस्टिक प्रेडिक्टेबिलिटी- ही कल्पना मोडीत काढली.

लॉरेंझने केऑस थिअरीबाबतचे मूलभूत स्वरूपाचे काम केले होते त्याला १० वर्षे झाली होती. लॉरेंझचा शोधनिबंध त्याने जगासमोर ठेवल्यानंतर १० वर्षांनी यॉर्क व स्मेल या दोन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांना तो 'डिटरमिनिस्टिक नॉन-पिरिॲडिक फ्लो' हा शोधनिबंध मिळाला व ते अचंबित झाले. त्यांना आढळले की, दहा वर्षांपूर्वीच लॉरेंझ या हवामान व गणित शास्त्रज्ञाने विश्वातल्या अनियमिततेचे व अनिश्चिततेचे गणित व पदार्थविज्ञान या दोन महत्त्वाच्या शास्त्रांना अनुसरून स्पष्टीकरण दिले आहे. मग त्यांनी त्या शोधनिबंधाच्या अनेक प्रती काढल्या व वैज्ञानिकांत वाटल्या. लहानशी घटनादेखील मोठ्या परिणामाचे कारण बनू शकते, याचे वैज्ञानिक स्पष्टीकरण त्यांना लॉरेंझच्या शोधनिबंधात मिळाले. नॉन-लिनिअर गोष्टींना -ॲबरेशन- नेहमीपेक्षा वेगळेपणाने घडणारी गोष्ट म्हणून नजरेआड करता येत नाही, तसे करणे योग्य नाही हे त्यांना या शोधनिबंधातून लक्षात आले. या अनियमित स्वरूपाच्या घटनांचे वैज्ञानिक स्पष्टीकरण देता येते, ते देणे शक्य आहे, हे समजल्यावर डिटरमिनिस्टिक डिसऑर्डरचा अभ्यास शास्त्रज्ञांना करणे शक्य झाले.

मानवाची या जगातली निर्मिती, मानवी मनाची

निर्मिती प्रोटोप्लाजमपासून सुरुवात होऊन कित्येक वर्षांनंतर झाली. ती अशीच अनियमिततेचे चक्र निर्माण होऊन झाली असेल. अनेक आकारांतून निसर्ग एका आकाराची निवड सहजच, कुठलाही हेतू न ठेवता करत असतो.

विश्वातली अनियमितता व अनिश्चितता यांचे वैज्ञानिक स्पष्टीकरण केऑस थिअरी देते, हे तिचे वैशिष्ट्य व सामर्थ्य पण आहे.

**संदर्भ** : James Gleick - Chaos : Amazing Science of the Unpredictable. London, Vintage, 1998.

ଔଔଔ

# शेती, शेतकरी व शासन

लेखांक १

श्री. के. वनपाल

मी १९६४ साली महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन महाराष्ट्र शासनाच्या महसूल खात्यात दाखल झालो. पुढे मला बढती मिळून मी भारतीय शासनाच्या सेवेत अधिकारी झालो. मी स्वतः शेतकरी कुटुंबातील. नोकरीमुळे महाराष्ट्रातील सर्व विभागांत मला मामलेदार, जिल्हा परिषदेचा कार्यकारी अधिकारी, नगरपालिकांचा मुख्याधिकारी व अखेर महसूल खात्यात चिटणीस अशा निरनिराळ्या पदांवर अनुभव घेता आला. या प्रत्येक वेळी माझा शेतीशी जवळून संबंध होता. आता निवृत्त झाल्यानंतर शेती, शेतकरी, शेतमजुरांचे जीवन, त्यांचे प्रश्न आणि त्यांची सोडवणूक यांविषयी अनेक विचार मनात घोळत असतात. मला जे अनुभव आले ते खूपच गंभीर, गमतीशीर आणि वस्तुस्थितीचे दर्शन घडविणारे असल्याने ते सांगण्याची तीव्र इच्छा होते.

१९५७ साली सरकारने 'कसेल त्याची जमीन' हा मुद्दा घेऊन कुळकायदा केला. त्या वेळी आमच्या गावाकडे जमिनी होत्या. सर्व तुकडे मिळून सुमारे ७ एकर जमीन होती. या तुकड्यांच्या सातबारा उता-यांवर कुळाचे 'गणपती श्रीपती चव्हाण' हे नाव लागलेले होते. गणपती १९५४ सालीच वारला. त्याची विधवा बायको पुतळी ही आमची सर्व जमीन इतरांच्या साहाय्याने कसत होती. आमचे कुटुंब मुंबईत वास्तव्यास होते. विचार असा आला की, गावी जावे, पुतळीकडून कुळकायदा कलम-१७ प्रमाणे जमिनीबाबतचा तिचा राजीनामा मामलेदाराच्या समोर घ्यावा. आणि ती जमीन आज पावेतो होती त्याप्रमाणे तिच्याकडे वहिवाटीस ठेवावी. आम्हाला जमिनीतून काही उत्पन्न मिळत नव्हतेच. पुढेही पुतळीने आम्हाला काही द्यावे अशी अपेक्षा नव्हती. वडिलांचे म्हणणे असे की, ते गावी असताना आजारी पडले तर गणपती (पुतळीचा नवरा) त्यांना खांद्यावरून शेजारच्या गावी औषध पाणी करायला न्यायचा. तेव्हा त्याच्या बायकापोरांना आपली मदतच झाली पाहिजे. आपले आपण कसेही भागवू.

पूर्वीचे विश्वासाचे संबंध लक्षात घेऊन ती (पुतळी) हे सर्व मान्य करील, अशी सगळ्यांचीच खात्री. माझे कॉलेजचे पहिले वर्ष संपले होते. एखादे वर्ष वाया गेले तरी चालेल पण हे प्रकरण मार्गी लावावे या उद्देशाने मी, आई व वडील गावी आलो. माझे वय १७ वर्षांचे. सातारा जिल्ह्यातील कोरेगाव तालुक्यातील 'किलोरी' हे आमचे गाव.

आमच्या गावात तेव्हा चावडी नव्हती. लक्ष्मीआईच्या देवळात तलाठी किंवा सोसायटीचा सेक्रेटरी आपआपली कामे करीत. अशा वेळी गावातील संभावित व जरा वजनदार मंडळी तलाठ्याभोवती बसून असत. अशी एकदा बैठक जमलेली असताना सगळ्या जगाची काळजी असावी असा भाव चेह-यावर असलेला तलाठी आपले काम उरकत होता. चर्चेत आमचे कुटुंब गावी दाखल झाले हा विषयही होता. "केशव बामण कसा काय इकडे? मुंबईत होता नव्हं?" एकाने विचारले "नाही! ते जमिनीचा राजीनामा घ्यायला आलेत", मुद्दाम तलाठ्याला ऐकू जाईल अशी दुस-याने फुसकुली सोडली. दोघातिघांत 'सो कॉल्ड' प्रतिष्ठितांनी ते ऐकले. लगेच त्यांच्या डोक्यात विचारचक्र सुरू झाले. आणि संध्याकाळी ते घरीच आले.

त्यांनी सर्व विचारपूस सुरू केली. मुंबईत आमचे कसे चाललेय? थोरला मुलगा (माझे वडीलबंधू) याचा पगार किती? मुंबईत खोल्या किती? पोरीची लग्ने कधी? असे विचारून झाल्यावर गाडी मुद्द्यावर आली. "नव्हं, जमिनीचा ताबा घ्यायला आला नव्हे?" अशी सुरुवात झाली. वडीलांच्या उत्तराअगोदरच "तुमची पुतळी (विधवा कुळ) काय करती? आपण जमीन ताब्यातच घेऊ की! हवं तर नांगरच घालू. तुम्ही काही काळजी करू नका. आम्ही बघतो काय करायचे ते. मात्र बैलजोडणीसाठी, इतर कामासाठी थोडा पैसा तयार ठेवा म्हणजे झालं."

"काय बी काळजी करू नका" माझ्याकडे पाहून ते

अनुक्रमणिका



मला म्हणाले, "आता धाकलं मालक, तुम्हाला म्हणून सांगतो. एक स्वतःचा बैल घ्या, म्हणजे तुम्हीच जमीन करत होता हे दाखवायला बरं पडंल. नाही तर बैलच आणून लावतो दावणीला. त्यासाठी १००-१५० रुपये बाजूला काढून ठेवा. म्हणजे सगळं सोयीचं होईल."

मला काय करावे ते समजेना. दुस-याच दिवशी एकाने बैल दावणीला आणून बांधला. हे इतक्या झपाट्याने झाले की, मला हा प्रयोग यशस्वी होईल याची खात्री वाटायला लागली. आणि या लोकांचे आपल्यावर किती प्रेम आहे, असे वाटू लागले.

दोन-चार दिवसांतच कुठून तरी पैसे गोळा करून बैलाचे पैसे दिले. मालकाला खात्री होतीच की, बामण पैसे बुडवणार नाही. त्याच आठवड्यात हा बैल आणि दुसरा एक बैल व कुळवण्यासाठी दोन माणसे घेऊन आम्ही शेतावर गेलो. मला वाटले हे सगळे सुरळीत होणार. पण पाहतो तर पुतळी अगोदरच तिथे हजर! दोन-तीन माणसेही तिच्याबरोबर होती. जसा कुळव बांधावरून शेतात उतरला तशी पुतळी आडवी आली. काय करावं सुचेना.

"धाकलं मालक! काय लावलंय तुम्ही?", असं म्हणून पुतळी सरळ रानात कुळवासमोरच बसली. हा बैल घेऊन कुठे गेला म्हणून पाहायला वडील येतच होते. त्यांना हे सगळं समजल्यावर ते म्हणाले "चल, घरी चल. कायद्याने काय होईल ते पाहू. इथं भांडण-तंटा नको. मला वार्षिक रुपये १५०० उत्पन्नाचा मालमलेदाराकडून दाखला मिळालाय. (त्यांना दरमहा रुपये १७.५० अशी रेल्वेखात्याची पेन्शन होती.) त्या आधारावर कोर्टात लढू. हा अव्यापारेषु व्यापार नको." झालं. आम्ही घरी परतलो.

दोन-चार दिवस गेले. आता या बैलाचं काय? त्यातच त्याला मानेपाशी 'खांद्या' नावाचा रोग झाला. म्हणजे तो अगोदरच झालेला असावा; पण मला तो कळला नव्हता. त्या जखमेत अक्षरशः किडे वळवळायचे. त्याच्या उपायासाठी रहिमतपूर गावाच्या वा-या सुरू झाल्या. नंतर लक्षात आलं की, पुतळीच्या बाजूनेच असलेल्या लोकांनी दोन गट करून एकाने मला बैल विकून गंडवलं आणि कुळवकाठीचे २५०/- रुपये पण घेतले. शिवाय दुस-या गटाने मला कुळव घालताना पुतळीला पुढे करून आडकाठी केली. हा सर्व धूर्तपणाचा बनाव होता. गोष्ट तशी छोटी; अनुभव ......? त्या वेळचे घराचे वातावरण उद्ध्वस्त करणारा!

पुढे सात वर्षे झगडून 'सर्टिफिकेटेड लॅण्डलॉर्ड' या सदराखाली वडीलांना तहसीलदाराकडून निम्म्या जमिनीचा ताबा १९६४ साली मिळाला. आई-वडीलांना या केससाठी घालाव्या लागलेल्या हेलपाट्यांची गणतीच नव्हती. त्यात वडीलांचे धोरण तर अजबच! तारखेला जाताना 'पुतळीसाठी जेवण बांधून घ्या हो', हा हुकूम! ती कशीही वागली तरी आपण सरळच वागायचे, गणपानं आपली खूप सेवा केली होती. अपकारकर्त्यावरही उपकारच करावेत हे त्यांचे ब्रीद. पुतळीच्या आडकाठीमुळे शेतीही करता येईना. काय करावं ते सुचेना.

तेवढ्यात रहिमतपूरच्या डी. एड्. कॉलेजमध्ये तिथल्या संस्थेने क्लार्क म्हणून रुजू होण्यासाठी घरी निरोप पाठवला. मोकळाच होतो. म्हणून ती नोकरी पत्करली आणि बैल एकाला फुकट देऊन टाकला. दर आठवड्याच्या सुट्टीत रहिमतपुर ते किरोली वा-या सुरू झाल्या. तिकडे मुंबईत थोरल्या भावाला इकडची काळजी लागलेली. त्याने पत्र पाठवलं की, नोकरी सोडून मुंबईला ये; कारण ब्राह्मणांना शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही. परत आम्ही मुंबईला रवाना. पुढे योगायोग पाहा- बी. ए. झाल्यावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन नेमका जमिनीशी संबंध असलेल्या महसूलखात्यात तहसीलदार म्हणून रुजू झालो.

पंढरपूरला उमेदवार म्हणून रुजू झाल्यावर पुन्हा तलाठी दप्तराचा अभ्यास, डिपार्टमेंटची परीक्षा देण्यासाठी महसूल खात्याच्या कायद्यांचा अभ्यास असे सर्व सुरू झाले. काही अडचणी आल्या, तर प्रांत ऑफिसमधल्या कुलकर्णी नावाच्या अनुभवी कारकुनाची मदत. कारण लॅण्डरेव्हेन्यू कोडमधील रूल्स त्याला अक्षरशः मुखोद्गत! शिवाय इंग्रजी फर्डे! एके दिवशी त्याने एक गंमत सांगितली. नुकत्याच अस्तित्वात आलेल्या कुळकायद्याने बहुतेक निकाल कुळाच्या बाजूने व्हावेत हे अपेक्षित. पण हा पठ्ठ्या त्यातले बारकावे, परंतुके इत्यादींचा फायदा घेऊन मालकाचीही बाजू मांडून निकाल

लिहू शकत असे. इतके नव्हे तर प्रांतासाठी (म्हणजे डेप्युटी कलेक्टरसाठी) स्वतः कुळाचे बाजूने एक आणि मालकाच्या बाजूने दुसरे अशी दोन निकालपत्रे तयार करून प्रांत ऑफिसला दाखवीत असे. वास्तविक प्रांताने स्वतः निकालपत्रे लिहायची; पण त्या कायद्याचा अभ्यास पाहून प्रांतदेखील यालाच निकालपत्र लिहून आणायला सांगायचे. ज्याच्या बाजूने निकाल येईल, त्या पार्टीकडून दक्षिणा घ्यायला हा मोकळा. पुढे तो निलंबित वगैरे झाला; पण त्याचे व्यवहारचातुर्य आणि अभ्यास वादातीत!

(१)

माझ्या किरोली आणि रहिमतपुर येथील कष्टांची कल्पना मुंबईत भावाला येत होती. माझ्या ऐन जवानीतल्या उटपटांग प्रयोगाची त्याला गंमत वाटत होती. पण काळजी त्याहून जास्त वाटत होती. शेवटी त्याने एक पत्र पाठवले आणि कळवले की, अर्धवट सोडलेले शिक्षण पहिल्यांदा पूर्ण कर. मलाही ते पटले. पण रहिमतपुरचे कॉलेज माझा राजीनामा घेईना. मला पगार १००रु. आणि कॉलेज देणगीदाखल ३५ रु. कापून घेई. आणि हातावर ६५ रु. ठेवत असे. पूर्णवेळ राबणारा दुसरा कोणी मिळेल याची त्यांना खात्री नसावी. शेवटी 'तुम्ही राजीनामा स्वीकारा न स्वीकारा मी चाललो!' असे सांगितल्यावर त्यांचे काही चालेना. प्रिन्सिपॉल व वडेकर माझ्यावर फार खूष होते. त्यांनी स्वतः टाईप करून मला कॅरेक्टर सर्टिफिकेट दिले. ते एक प्रकारचे एक्सपिरियन्स सर्टिफिकेटच होते. त्यामुळे मुंबईत आल्यावर मला एम्प्लॉयमेंट एक्सचेंजतर्फे नोक-या आल्या आणि शिक्षण करताकरता नोकरीची संधी मिळाली.

मुंबईत येऊन तीन-चार वर्षे झाली. पदवीचे शिक्षण पूर्ण झाले. आणि नोक-या बदलतबदलत शेवटी मी अकौटंन्ट जनरलच्या ऑफिसमध्ये अप्पर डिव्हिजन क्लार्क म्हणून कामाला लागलो. वास्तविक आकडेमोड, ऑडिट अशा अगम्य विषयांची मला अजिबात आवड नव्हती. पण योगायोगाची गंमत ती पाहा. तिथे माझ्याकडे प्रोव्हिडंट फंड नोंदणीचे काम होते आणि लोअर डिव्हिजन क्लार्क म्हणून कृष्णा जोशी नावाचा मनुष्य माझ्या मदतीला होता. जेवणाच्या वेळी आम्ही एकत्र डबा खायचो. एक दिवस तो म्हणाला, "जरा बाहेरचा चहा पिऊ या. इथल्या कँटीनचा चहा फार गोड असतो." म्हणून आम्ही दोघे बाहेरच्या इराण्याच्या हॉटेलमध्ये चहा पिऊन परत आलो. आल्यावर त्याच्या लक्षात आले की, त्याचे कागदाचे पाकीट चुकून हॉटेलातच राहिले आहे. त्यात त्याचे विम्याच्या हप्त्याचे १२५ रु होते. १९६२ सालचे ते १२५रु! दोघेही हादरलो परत जाऊन तिथे बघितले तर सापडेल, असा मी त्याला धीर दिला. लगेचच हॉटेलात गेलो आणि पूर्वी ज्या टेबलाशी बसलेलो होतो तेथे बसलो. बाजूलाच, टेबलाखाली एक पाकीट दिसले. ते हळूच मी पायाने सरकवत जवळ ओढले आणि खाली वाकून उचलले. ते कृष्णाचे पाकीट होते व त्यात १२५ रुपयेही जसेच्या तसे दिसले. एक कप चहा पुन्हा मागवून घेतला आणि पिऊन हळूच सटकलो...... अजूनही तो प्रसंग आठवला की, मजा वाटते.

त्या दिवशी कृष्णाने ऑफिसमध्ये येईपर्यंत "तू ग्रॅज्युएट आहेस. तेव्हा एम. पी. एस. सी. च्या मामलेदाराच्या परीक्षेला का बसत नाहीस?" असे विचारले. मी "बघू", म्हणालो. पण त्याने हट्ट धरला. अकौंटंट जनरलच्या ऑफिसपासून बँक ऑफ इंडियाची बिल्डिंग फार दूर नव्हती. लगेच आम्ही ऑफिस सुपरिंडेंटला सांगून एम. पी. एस.सी. च्या ऑफिसकडे निघालो. ते बंद व्हायच्या आत फॉर्म घेतला आणि मजकूर वाचला, तर फॉर्मच्या बरोबर रु. ४६-५० या किंमतीची पोस्टल आर्डर जोडायची सूचना होती. आणि फॉर्म भरण्याची शेवटची तारीख दोन दिवसांनी संपणार होती. माझ्याजवळ पैसे तर नव्हतेच. कृष्णा म्हणाला, 'पैशाची काळजी कशाला करतोस? हे पाकीट जर दुपारी मिळाले नसते तर काय केले असते? ह्यातले तू ५० रु घे आणि उद्याच अर्ज भर. न विसरता!" दुस-या दिवशी त्याने माझ्याकडून सगळं सगळं करुन घेतलं आणि फॉर्म दाखल करायलाच लावला. पुढे दोन महिन्यांनी मी कृष्णाचे ५० रु परत करू शकलो.

फॉर्म तर भरला; पण अभ्यास? अभ्यासाला तर वेळच नसे. काही दिवसांनी आपण फॉर्म भरला हेही मी विसरलो. जेव्हा परीक्षेसाठी एम. पी. एस.सी. कडून पत्र आले, तेव्हा जागा झालो. परीक्षेच्या तारखांवरून चार-पाच दिवस रजा टाकावी लागेल, असे वाटले.

रजा घेतली आणि परीक्षा दिली.

एव्हाना मी अकाउंटंट जनरलच्या ऑफिसपेक्षा सचिवालयातील नोकरी बरी म्हणून तिथल्याही ज्युनिअर असिस्टंटची परीक्षा देऊन पास झालो होतो. तिथे निवड झाल्यामुळे सचिवालयात गृहखात्यात रुजू झालो. यथावकाश एम. पी. एस.सी. च्या लेखी परीक्षेत पास झालो. इंटरव्ह्यूचा कॉल आला. इंटरव्ह्यूही पार पाडला. पहिल्या तीस जणांमध्ये निवड झाल्यामुळे मामलेदाराच्या नोकरीत रुजू होण्यासाठी महसूल खात्यातून पत्र आले.

कृष्णा मला पुढे कधीच भेटला नाही. कृष्णाच्या या छोट्याशा पण अत्यंत महत्त्वाच्या वेळेस मिळालेल्या मदतीमुळेच माझ्या संपूर्ण जीवनाला कलाटणी मिळाली. एक वर्षापूर्वी कळले की, कृष्णा नुकताच पुण्यात देवाघरी गेला. खूप, खूप, खूप.....दुःख झाले. तो त्या वेळी ५० रुपये न देता तर? एकेकाचे ऋण म्हणतात ते हे. तो माझा ऋणी होता की, मी आता त्याचे ऋण पुढच्या जन्मी फेडायचे?

मुंबईच्या ऑफिसातील नोकरीत माझा फक्त कागदांशी संबंध होता. आता मामलेदाराच्या नोकरीत खात्यातील वरिष्ठाशी, कनिष्ठांशी, कचेरीत येणा-यांशी आणि ब-याबाईट अनुभवांशी प्रत्यक्ष सामना करायचा होता. त्याबद्दलचे विचार मनात घोळत असायचे. त्यातले सुरुवातीचे गमतीदार अनुभव सांगावेसे वाटतात.

महसूल खात्याने मला पुण्याच्या कमिशनर ऑफिसमध्ये जाऊन पुढील आदेश घेण्याचे कळवले होते. माझा मित्र पुंडे माझ्यासारखाच मामलेदार झाला होता. त्याला औरंगाबाद डिव्हिजन मिळाली होती. पुण्याला जाऊन नोकरीचा आदेश घेऊन मी सोलापूरला आणि तो औरंगाबादला असे निघालो.

८ एप्रिल ६४ ला सोलापूरच्या कलेक्टरांकडे रुजू होण्यासाठी कचेरीत गेलो. रेसिडेन्ट डेप्युटी कलेक्टर आळतेकर म्हणून होते. त्यांच्या कचेरीमध्ये बसून कलेक्टर-साहेबांची वाट पाहत होतो. आळतेकर म्हणाले, "आता दोन वर्षांनी उमेदवारी संपल्यावर जबाबदारीने आणि इभ्रतीने मामलेदाराची नोकरी करावी लागेल. येईल त्या प्रसंगाला सावधपणे व चतुरपणे तोंड द्यावे लागेल. अवघड प्रसंगी धाडसी निर्णय स्वतःच्या जबाबदारीवर घ्यावे लागतील. मुख्य म्हणजे दिलेल्या तालुक्याची खडान् खडा माहिती तोंडावर असली पाहिजे; इतकी की, तालुक्याच्या क्षेत्रफळावरील आभाळात किती तारे आहेत आणि खाली किती खनिजे आहेत, हेदेखील सांगता आले पाहिजे." त्यावेळचे वरिष्ठ तरी पहा! काय हा पहिलाच धडा! हादरलोच.

नंतर त्यांनी हसतमुखाने मला कलेक्टरच्या चेंबरमध्ये पाठवले. गफूर नावाचे कलेक्टर होते. अतिशय दयाळू आणि सहृदय, पण तितकेच कोपिष्ट होते, असे अगोदरच कळले होते. भीतभीत चेंबरमध्ये गेलो. पण काय आश्चर्य, त्यांनी स्वतः उभे राहून हस्तांदोलन करून हसतमुखाने आमचे स्वागत केले. त्यांचा हात इतका मऊ आणि गुबगुबीत होता की, तो स्पर्शच आश्वासक वाटून गेला.

ଓଓଓ










**व्यक्ती, प्रसंग आणि आठवणी :**

# हिंदू सभेची संध्याकाळ व जनसंघाची सकाळ

दीर्घस्मृती

(१)

सुमारे ५५ वर्षांपूर्वी पुणे शहरातील राजकारणात एक संक्रमण झाले. पुण्यात, विशेषतः ब्राह्मण मध्यमवर्गीयांत, हिंदुमहासभेच्या विचारसरणीचा मोठा प्रभाव हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळेपर्यंत होता. स्वातंत्र्यानंतर गांधीजींचा खून झाला व त्या खुनाच्या कटातील आरोपी हिंदुत्वाच्या विचारसरणीची झिंग चढलेले होते. त्या व्यक्ती हिंदू महासभेच्या सभासद होत्याच पण गांधीजींच्या खुनाची योजना आखण्यासाठी ते लोक दिल्लीच्या हिंदूमहासभा-भवनात अनेकदा उतरले होते. गोळीबाराचा सरावही त्यांनी हिंदुमहासभा भवनाच्या मागील माळावरच केला होता. इतके असून, विचित्र गोष्ट अशी की, गांधीजींच्या खुनानंतर त्या वेळच्या भारत सरकारने हिंदुमहासभेवर बंदी घातली नाही आणि राष्ट्रीय स्वयंसेवक संघावर मात्र बंदी घातली. नेहरूंच्या मंत्रिमंडळात हिंदुमहासभेचे प्रतिनिधी श्यामाप्रसाद मुखर्जी काम करीत राहिले. त्यांचा राजीनामा नेहरूंनी मागितला नाही.

पण गांधीखुनानंतर पुण्यातील हिंदुत्ववाद्यांनी आणि त्यातही ब्राह्मणांनी चांगलीच हाय खाल्ली. भारतीय घटनेप्रमाणे प्रत्येक सज्ञान व्यक्तीला मतदानाचा अधिकार मिळाला. त्यामुळे या हिंदुत्ववादी ब्राह्मण मंडळींची अल्पसंख्यांकता अधिकच नजरेत भरू लागली. पक्षांमार्फत उघडपणे सभा घ्यायला आणि आपले विचार मांडायला बंदी नव्हती. पण अशा सभा घेण्यासाठी जो बेधडकपणा लागतो, तो हिंदुसभेकडे नव्हता. हिंदुसभेचे सर्वोच्च पुढारी स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी राजकारणातून निवृत्ती पतकरली. त्यामुळे हिंदुत्ववाद्यांचे छत्रच हरपल्यासारखे झाले. असे असले तरी पुण्यातील अनेक संस्था अशा होत्या की, जिथे हिंदुत्ववादी ब्राह्मण अधिकारावर होते. तेथे ही मंडळी अड्डे करून बसत आणि सद्यःस्थितीचा आपल्या परीने विचार करीत.

असाच एक अड्डा मी ज्या वाड्यात राहत होतो, तेथील घरमालकांकडे भरत असे. आमचे घरमालक दादा गोखले हे अगदी 'अल्लाघरची गाय' म्हणावे इतके निर्मळ आणि कनवाळू होते. मात्र सावरकरांवर त्यांची अतिशय निष्ठा होती. त्यांच्या तरुणपणापासून ते पुण्यातील हिंदुसभेच्या वर्तुळातून वावरत होते. पन्नाशीच्या दशकाच्या शेवटी पुण्यातील हिंदुसभा अगदीच क्षीण झालेली होती. हिंदुसभेचे जयंतराव टिळक हे १९५७ सालच्या निवडणुकीत संयुक्त महाराष्ट्र समितीच्या छत्राखाली मुंबई विधानसभेवर निवडून गेले होते खरे; पण त्यांची वर्तणूक अशी असे की, 'मी हिंदुमहासभेचा म्हणून निवडून गेलो नसून हिंदुसभेत असूनही निवडून आलो आहे!'

त्यामुळे महाराष्ट्र प्रांतिक हिंदुमहासभा किंवा शहरातील नगर हिंदुमहासभा यांच्यापासून ते लांबच राहत. महाराष्ट्र हिंदुसभेचे काम श्री. शंकरराव ऊर्फ मामा दाते आणि सोलापूरचे पाटील नावाचे गृहस्थ यांच्याकडे होते. पुणे शहर हिंदुसभेत गणपतराव नलावडे, कृष्णराव गांगुर्डे, होनराव अशी माणसे होती. आमचे दादा गोखले पुणे शहर नगर हिंदुसभेचे कोशाध्यक्ष (खजिनदार) होते. हा प्रकार 'ओसाड गावचा राजा' अशाच पद्धतीचा होता. ५७ साली विधानसभेच्या निवडणुकीत संयुक्त महाराष्ट्र समितीला चांगले यश मिळाले. नंतर पुणे महानगर-पालिकेच्या निवडणुका आल्या. त्याही समितीने लढवल्या. कॉंग्रेस निवडणुकीत उतरलीच नाही. (असे असले तरी १९६० साली म. न. पा. मध्ये अशी स्थिती आली की, कॉंग्रेस हा बहुमतवाला पक्ष झाला.) समितीच्या नावावर अनेक हिंदुसभावादी लोक मनपावर निवडून गेले. त्यामुळे थोडा काळ का होईना, हिंदुसभेला थोडे बाळसे आले.

अर्थात हिंदुसभेने लोकशाहीप्रणीत निवडणुका स्वीकारल्या असल्या, तरी अनेक भडक डोक्याच्या

अनुक्रमणिका






हिंदुत्वनिष्ठांना निवडणुका, त्यातून निवडून येणारे प्रतिनिधी आणि बहुमताने निवडून आलेल्या पक्षाचे सरकार हा सारा लबाडीचा मामला वाटत असे. त्यांतला एक 'विचारवंत' मला म्हणालादेखील की, "अरे, ती लोकसभा आणि तो नेहरू आणि त्याचे सरकार यांना विचारतं कोण? एक दिवस आम्ही पाच-सातशे लोकांना घेऊन लोकसभेवर चाल करून जाऊ आणि म्हणू 'अरे बेवकुफांनो, तुमच्या जागा खाली करा! हे आमचे पाचशे लोक तिथे बसतील आणि राज्य चालवतील.' बघू कुणाची हिंमत आहे आम्हाला अडवण्याची!" या अड्ड्यातील माणसांची सावरकरांवर पराकोटीची भक्ती होती. त्यांच्या लिखाणातील आणि भाषणातील वाक्येच्या वाक्ये ही भक्तमंडळी धडाधडा म्हणून दाखवत असत. उदा., 'शरण की मरण? मरण की शरण? असला पौरुषहीन प्रश्न विचारता कसा? शूराचे उत्तर एकच' 'रण! रण! आणि रणच.' किंवा 'अम्बतमे, नदीतमे, देवीतमे, सिंधू तुझ्या वाचून हिंदू? प्राणावाचून कुडी? अशक्य!'

या सावरकरभक्तांपैकी पुष्कळ जण बलोपासनाही उग्र निष्ठेने करीत असत. शंभर-सव्वाशे नमस्कार घालणे, दोनदोनशे उठाबशा काढणे, हातावर उलटे उभे राहून चालणे, असे अनेक चमत्कार ते करीत. त्यांच्यात एक बाणे नावाचा मनुष्य होता. आमच्या घराला तीन मजले चढून जाणारा एक जिना होता. त्या जिन्याच्या कठड्यावर वरून हातावर उलटे उभे राहून बाणे सर्व मजले चढून गेले आणि तसेच उतरलेही. हा एक मोठाच देखावा झाला; आणि आळीतील साठ-सत्तर माणसे आमच्या अंगणात ही कसरत बघायला जमा झाली होती. पुणे शहर हिंदुसभा, वर सांगितल्याप्रमाणे, अगदीच आक्रसून गेली असली तरी तिच्यातही दोन-तीन स्तर होते. अगदी उच्च पातळीवर बा. ब. गोगटे, मामा दाते असे पुढारी होते. मधल्या थरावर आमचे किराणा दुकानाचे मालक सहस्रबुद्धे, गणपतराव नलावडे, गांगुर्डे वगैरे मंडळी असत. आमचे दादा गोखले, रा. स. भट, होनराव ही माणसे सर्वांत खालच्या पायरीवर काम करीत. असे असले तरी ह्या तीनही पातळ्यांवर मोकळे दळणवळण चालत असे.

श्री. ग. वि. केतकर हे हिंदुसभेचे सभासद बहुधा नसावेत. ते त्या वेळी 'तरुण भारत' या संघ-जनसंघाच्या दैनिकाचे संपादक होते. ते लोकमान्य टिळकांचे नातू आणि 'केसरी' चे माजी संपादक होते. गांधीहत्येच्या वेळी ते केसरीच्या संपादकपदी होते. त्या काळातले त्यांचे अग्रलेख अतिशय गाजले होते. या अग्रलेखांबद्दल तेव्हाच्या मुंबई सरकारने केसरीवर खटला भरून जामीनाची मागणी केली होती. परंतु मुंबई हाय कोर्टात केसरीवरील सर्व आरोप अस्थानी ठरवण्यात आले, आणि केसरीची सुटका झाली. न्या. छगला यांनी निकालपत्रात म्हटले होते की, 'महाराष्ट्राचे मन कळण्यासाठी 'केसरी' वाचावा लागतो, असे मी विद्यार्थिदशेपासून मानत आलो आहे.' पुढे संघबंदी उठवावी यासाठी केतकरांनी पुष्कळच खटपट केली. ते दिल्लीला जाऊन सरदार पटेलांनाही भेटले. त्यानंतर संघबंदी उठवण्यात आली. या उद्योगांमुळे केतकरांची प्रतिष्ठा कळसाला पोचली. नंतर असे झाले की, एका परदेशी ख्रिस्ती साध्वी स्त्रीशी केतकरांचा परिचय झाला. केतकर विधुर होते. आणि बाई अविवाहित होत्या. त्या दोघांनी विवाह करण्याचे ठरवले. यात खरे तर चुकीचे काही नव्हते. परंतु याच कारणाने 'केसरी'तील त्यांचे संपादकपद गेले असे बोलले जात असे.

असे हे केतकर आमच्या दादा गोखल्यांच्या अड्ड्यावर मधूनमधून येत. त्यांच्या गप्पा फारच वरच्या दर्जाच्या असत. त्यांचा गीतेचा व्यासंग फार खोल होता. अंध विद्वान सदाशिवशास्त्री भिडे यांच्या सहकार्याने त्यांनी 'गीताधर्म' मंडळ स्थापन केले होते. दर गीताजयंतीला त्यांचा केसरीत लेख येत असे. त्यांचे आजोबा, लोकमान्य टिळक, यांच्या 'गीतारहसा'चा गाढ अभ्यास केतकरांनी केला होता. गीतेच्या प्रतिपाद्याविषयी टिळक आणि गांधी यांच्यात काय मतभेद होते व अखेर टिळकांनी आपले म्हणणे गांधीजींना कसे मान्य करावयास लावले, याची आठवण ते खुलवून सांगत असत. दैनंदिन राजकारणाविषयी ते सहसा बोलत नसत. त्यासाठी 'तरुण भारतातील माझे लेख वाचा' असे ते सांगत.

त्यांचा लेखक, मला वाटते, कुलकर्णी नावाचा होता. तो आमच्याच वाड्यातील रिकाम्या खोलीत झोपण्यासाठी येत असे केतकरांमुळेच दादा गोखल्यांनी त्याचीही व्यवस्था लावून दिली असावी. त्याच्याकडे काही सामान नव्हते.








एक बारके गाठोडे त्याने खोलीतील कपाटात ठेवले होते. ते तो कधीही उघडत नसे आणि म्हणूनच आम्हा काही जणांना त्याविषयी कुतूहल वाटे. अखेर एके दिवशी उत्सुकता अनावर होऊन मी आणि माझ्या मित्रांनी ते गाठोडे सोडून बघितले. तर त्यात काऊंट द साद या लेखकाचे 'थाउझंड अँड वन नाईट्स ऑफ ए सोडोम्' हे सचित्र पुस्तक होते. त्या वेळीही आम्हास हे माहीत होते की, साद याचे हे पुस्तक अतिशय अश्लील आहे. (आता माझी त्याविषयीची मते बदलली आहेत.) आम्ही ते पुस्तक बघत असताना कुलकर्णी तेथे आला आणि म्हणाला 'वाऽवा! पुस्तक पाहात आहात? काही हरकत नाही. मात्र मला विचारले असते तर बरे झाले असते.' गोष्ट अशी होती की, कुलकर्णी आम्हाला सहसा भेटतच नसे. पहाटे उठला की, तो नळाखाली आंघोळीला उभा राही व जो नाहीसा होई, तो रात्रीच दहा वाजता येत असे. त्या कुलकर्ण्यामुळेही केतकर आमच्या वाड्यात येत असावेत.

(२)

गांधीखून व त्यानंतरची राजकीय वावटळ निवळल्यावर शामाप्रसाद मुखर्जी यांनी असा विचार केला की, हिंदुसभा केवळ हिंदूपुरती ठेवणे हे नवीन राजकीय वातावरणाला धरून होणार नाही. हिंदुसभेचे सभासद होण्याची मुभा हिंदू नसलेल्यांनाही दिली पाहिजे. त्या वेळी पुण्यातले नामवंत वकील ल. ब. भोपटकर हे हिंदुसभेचे अध्यक्ष होते. भोपटकर हे फार कुर्रेबाज गृहस्थ होते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून ते जवळजवळ पन्नास वर्षे राजकारणात होते. त्यांनी अनेक होतकरू तरुणांना मदत केली होती. टिळकांच्या आयुष्याच्या शेवटी पुण्यात 'लोकसंग्रह' नावाचे दैनिक टिळकपक्षीयांनी चालवले होते. भोपटकर त्याला आर्थिक मदत करीत असत. टिळकांच्या मृत्यूनंतर टिळकांचे मुलगे व केसरीचे विश्वस्त यांच्यात दीर्घकाळ खटला चालला. तेव्हा भोपटकर हे केसरीच्या विश्वस्तांचे वकील होते. न. चि. ऊर्फ तात्यासाहेब केळकर आणि भोपटकर यांचे घनिष्ठ संबंध होते. त्यामुळे तात्यासाहेब केसरीचे विश्वस्त म्हणून निवृत्त झाल्यावर त्यांनी भोपटकरांना केसरीचे विश्वस्त केले. भोपटकर महाराष्ट्रातील काँग्रेस पक्षात, जुन्या काळात आघाडीचे नेते होते. असहकार चळवळीत त्यांनी त्यांना भरपूर पैसे मिळवून देणारी वकिली सोडली होती. गांधीजींच्या सत्याग्रह चळवळीतही त्यांनी भाग घेतला होता. १९३५ सालच्या 'कम्युनल अ‍ॅवार्ड' नंतर त्यांनी काँग्रेसशी संबंध सोडला व ते लोकशाही स्वराज्य पक्षांत गेले. ३७ सालच्या निवडणुकीत त्यांनी काँग्रेस विरुद्ध निवडणुक लढवली. पुण्यातील मतदार संघातून ते विधानसभेवर निवडून जातील, असा दाट विश्वास सर्व हिंदुसभावाल्यांना होता. खुद्द सावरकरांनी पुण्यात कोप-याकोप-यांवर सभा घेऊन लोकशाही स्वराज्य पक्षाचा, म्हणजे हिंदुसभेचा प्रचार केला होता.

आमचे दादा गोखले आणि त्यांचा अड्डा यांनी तर भोपटकरांच्या प्रचारासाठी जिवाचे रान केले होते. पण दुर्दैव असे की, भोपटकरांचा सणसणीत पराभव झाला. याबद्दलची हळहळ अड्ड्याचे सभासद अगदी ६० सालापर्यंत बोलून दाखवत असत.

भोपटकर हे बलोपासक गृहस्थ होते. लाठीचे वर्ग ते चालवत असत. हिंदूंनी शस्त्रे वापरण्याचे शिक्षण घ्यावे, बंदुका, पिस्तुले चालवायला शिकावे. निदान लाठी तरी फिरवावीच, असा त्यांचा आग्रह असे. शिवाजी मंदिरात त्यांची वारंवार व्याख्याने होत. मंदिराच्या शेजारीच त्यांचे विशाल दगडी घर होते. लाठीचा प्रचार करताना ते सांगत "एका बाजूला चारूचंद्र व दुस-या बाजूला मधुसूदन (हे भोपटकरांचे मुलगे) आणि मध्ये मी असे आम्ही तिघेजण हातात लाठी घेऊन रस्त्यात उभे राहिलो आणि शिवाजी मंदिराकडून बेफाम जमाव आमच्या घरावर चालून आला तर, मला नाही वाटत, दहा-पाच लोकांचे मुडदे पडल्याखेरीज तो जमाव पुढे येऊ शकेल!" भोपटकर स्पष्टवक्ते होते. ते कुणाची भीडभाड बाळगत नसत. अशा भोपटकरांना भेटायला मुखर्जी पुण्याला आले. दोन-तीन दिवस बोलणी झाली. भोपटकरांनी मुखर्जींची सूचना कडवटपणे फेटाळून लावली. सर्वधर्मीयांना हिंदुसभेत प्रवेश दिला तर हिंदुसभा आणि काँग्रेस यांच्यात फरकच उरणार नाही, असे भोपटकरांचे म्हणणे होते.

यानंतर मुखर्जींनी हिंदुत्वाचा विस्तार करून, त्यात धर्माने हिंदू नसणा-यांनाही घेऊन नवीन पक्ष काढण्याचे ठरवले. या पक्षाला कार्यकर्ते मिळावेत म्हणून ते

सरसंघचालक गोळवलकर गुरुजी यांच्याकडे गेले. खुद्द गुरुजींना राजकीय सत्ता व पक्षीय राजकारण यांचा तिटकारा होता. परंतु त्यांनी सांगितले की, संघातील स्वयंसेवकांनी संघ सोडून मुखर्जींच्या पक्षाचे काम करायला हरकत नाही. (तसे पाहिले तर स्वयंसेवकांनी संघ सोडून काँग्रेसचे काम करायलाही गुरुजींनी नकार दिला नसता. खरेतर सरदार पटेलांनी संघाने काँग्रेसमध्ये सामील व्हावे, असे आमंत्रणही दिले होते.) मुखर्जींना मिळालेले पहिले दोन उत्साही व अभ्यासू असे स्वयंसेवक म्हणजे अटल बिहारी वाजपेयी आणि दीनदयाळ उपाध्याय. याखेरीज दर राज्यातील पक्षाची धुरा सांभाळण्याकरता काही स्वयंसेवक पुढे आले. महाराष्ट्रातील कार्य रामभाऊ गोडबोले पाहत, तर कर्नाटकातील पक्षाचे काम जगन्नाथराव जोश्यांकडे होते. आमच्या दादा गोखल्यांशी जगन्नाथरावांचे नाते होते आणि वाड्यात ब-याच खोल्या रिकाम्याही होत्या. त्यामुळे जगन्नाथराव आमच्या (म्हणजे मी जिथे राहात असे, त्या) वाड्यात मुक्कामाला असत. पुणे शहरात पक्षाच्या कार्याचा प्रसार व्हावा म्हणून रामभाऊ म्हाळगी आणि यशवंतराव केळकर यांची नेमणूक झाली होती. ही ५२-५३ सालची हकिकत आहे. पुण्यात पक्ष अगदीच लहान असला, तरी पक्षाविषयी सहानुभूती बाळगणारे लोक पुष्कळ होते.

जनसंघाविषयी सहानुभूती वाटणारे पुष्कळ लोक पुण्यात असले, तरी त्या पक्षासाठी स्वतः काम करणारे लोक तेव्हा तरी हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेच होते. पक्षाची आर्थिक स्थिती अगदीच दयनीय होती. इतकी की, पक्षाच्या कार्यालयाचे भाडे भरण्यासाठीसुद्धा पैसे नसत. मग रामभाऊ म्हाळगी, यशवंतराव केळकर, मालतीबाई परांजपे अशी कार्यकर्ती माणसे आळीपाळीने कार्यालयाचे भाडे भरत. परप्रांतांतील पुढा-यांनी पुण्याला भेट दिली. तर त्यांचा पाहुणचारही या कार्यकर्त्यानाच आपल्या घरी करावा लागे. बलराज मधोक, वाजपेयी, दीनदयाळ उपाध्याय, डॉ. रघुवीर यांच्यासारखी अत्युच्च पदावरील नेतेमंडळी पुण्यात आली, तरी सा-या कार्यकर्त्यांच्या दोन-तीन खोल्यांच्या घरात उतरत असत. पुणे शहराविषयी संघस्वयंसेवकांच्या मनात आदराची भावना होती आणि तीच जनसंघाच्या पुढा-यांतही उतरली होती. त्यामुळे हे नेते वारंवार पुण्यात येत. त्यांच्या चर्चासभा आजच्याप्रमाणे पंचतारांकित हॉटेलात न होता कोणत्यातरी मंगल कार्यालयात होत असत. स्थानिक पातळीवरच्य कार्यकर्त्यांना श्रेष्ठ पातळीवरील नेत्याशी बोलण्याची संधी अशा वेळी लाभत असे. साहजिकच या वरिष्ठ पातळीवरील नेत्यांची आपसातील भांडणे, मतभेद, आणि असूया या कार्यकर्त्यांपर्यंत पोचत असत. बलराज मधोक यांना वाजपेयी व उपाध्याय यांच्याविषयी अतिशय स्पर्धा वाटे व अहंकारी भाषेत ती स्पर्धा ते कार्यकर्त्यांना बोलून दाखवीत. एखादा कार्यकर्ता मधोकांना एकटाच भेटला तर त्याच्याविषयी कुजबुजीला सुरुवात होई. त्यामुळे स्थानिक कार्यकर्ते मधोकांना एकएकटे भेटत नसत. दोघे-तिघे मिळून भेटायला जात. इतर काही उच्चस्तरीय पुढा-यांविषयीदेखील अशा बोलवा असत.

स्थानिक कार्यकर्त्यांचे मुख्य काम म्हणजे शहरातील भाग वाटून घेऊन घराघरांतून पक्षाचा प्रचार करणे. यासाठी दोघे-तिघे स्वयंसेवक वाड्यावाड्यांत जात व घरच्या माणसांशी गप्पागोष्टी करत. सततच्या वावरातून संपर्क साधणे आणि कार्यकर्ते गोळा करणे हा त्या सुरुवातीच्या काळातला एक उद्योगच होता. कार्यकर्त्यांना आणि लोकांना एकत्र आणण्यासाठी निरनिराळी निमित्ते कायम सापडतच असतात. त्या काळात कडक रेशनिंग होते व रेशन कार्डावर आठवड्याला मिळणारे धान्य अगदीच तुटपुंजे व खालच्या दर्जाचे असे. या बाबतीत तेव्हाच्या समाजवादी पक्षाने सत्याग्रह सुरू केला होता. या सुरुवातीच्या काळातही जनसंघाने समाजवाद्यांशी स्पर्धा अंगीकारली होती. त्यामुळे रामभाऊ म्हाळगी, यशवंतराव केळकर, मालतीबाई परांजपे वगैरे जनसंघीयांनी कलेक्टर कचेरीच्या आवारात उपोषण केले होते. ते उपोषण ११ ते ४ अशा सोयीच्या वेळात होते.

जनसंघ आणि हिंदुसभा यांच्यातील संबंध मात्र सवतीमत्सरासारखे होते. दोन्हीही पक्ष हिंदुत्ववादीच. दोघांनाही सावरकरांविषयी नितांत आदर. गांधीहत्येपर्यंत हिंदू सभेची मनःस्थिती अशी होती की, संघ ही आपलीच युवाशाखा आहे. परंतु गोळवळकरगुरुजींनी मात्र संघाला हिंदू सभेपासून अलिप्त ठेवण्याचा आग्रह धरला होता.

आता एकाएकी संघाने जनसंघाच्या रूपाने राजकीय मुखवटा घेतल्यानंतर हिंदू सभेच्या लोकांची 'संघाने आपल्या पाठीत खंजीर खुपसला' अशी संतापयुक्त समजूत झाली होती. जनसंघ आणि काँग्रेस यांत निवड करावी, असे हिंदुत्ववाद्यांच्या दृष्टीने काहीच नव्हते. आमच्या दादा गोखल्यांच्या अड्ड्यावर जनसंघाची कायम निंदा होत असे. व सध्याच्या राजकीय परिस्थितीत जनसंघाला काहीही भवितव्य नाही, असे ते एकमेकांना पटवून देत.

(३)

जनसंघाचा प्रचार करण्यासाठी 'भारत' नावाचे दैनिक पुण्यात होते. मुळात हे संघाचे दैनिक. संघाला त्या काळी दैनिक का काढावेसे वाटले, हा विचार करण्यासारखा प्रश्न होता. खरे म्हणजे संघाचे 'एकता' नावाचे मासिक होते. बाबासाहेब पुरंदरे, गो. नी. दांडेकर, अशी शैलीदार लेखकमंडळी 'एकते' शी संबंधित होती. गांधीहत्येनंतर आलेल्या संघबंदीच्या काळातही 'एकता' चालू राहिले होते. त्या संघबंदीच्या काळातच, मला वाटते, 'भारत' हे दैनिक प्रसिद्ध होऊ लागले. या दैनिकाचा कागद, त्याची छपाई, त्यातील बातम्यांचा दर्जा, हे सारे दयनीय होते. पण संघातील माणसे या दैनिकाकडे पैसे ठेव म्हणून ठेवीत आणि त्यावर ते दैनिक चाले.

१९५२ सालच्या निवडणुकांत जनसंघ हा एक लिंबूटिंबू पक्ष होता. शामाप्रसाद मुखर्जी यांच्याखेरीज त्या पक्षाला प्रदर्शनीय असा दुसरा चेहरा नव्हता. तरी पक्षाने जमतील तितक्या मतदारसंघांत उमेदवार उभे केले होते. त्या निवडणुकांत हिंदुमहासभा जनसंघापेक्षा थोडी वरचढच होती. सावरकर राजकारणातून निवृत्त झाले असले तरी भोपटकर, वि. ध. देशपांडे, ना. भा. खरे अशी वजनदार माणसे हिंदुसभेकडे होती. 'केसरी' नावाचे प्रतिष्ठित वर्तमानपत्र हाताशी होते. ते आठवड्यातून दोनदाच निघत असे, तरी 'भारता' ला तोंड द्यायला पुरेसे होते.

निवडणुकीत जनसंघाची दाणादाण उडाली. बहुतेक ठिकाणी त्यांची डिपॉझिट्सही जप्त झाली. हिंदुसभावाल्यांनी डिपॉझिटला 'हडप' हा शब्द शोधून काढला होता. ते जनसंघाची टिंगल करण्यासाठी 'हडप गडप जनसंघ' असे म्हणत असत. हिंदुमहासभेची स्थिती याहून काही बरी नव्हती. त्या काळचे 'भव्य भारत' हे राज्य ग्वाल्हेर व इंदूर अशा संस्थानांना एकत्र आणून तयार केले होते. या संस्थानिकांचा हिंदुसभेला पाठिंबा असल्यामुळे वि. घ. देशपांडे हे तिथल्या दोन मतदारसंघातून लोकसभेवर निवडून आले. मागून त्यांनी त्यांतल्या एका मतदारसंघातून त्या वेळचे हिंदुसभेचे अध्यक्ष ना. भा. खरे यांना निवडून आणले. जनसंघातर्फे एकटे शामाप्रसाद मुखर्जी निवडून आले होते, असे मला आठवते.

या निवडणुकीत हिंदुसभेने जनसंघावर जरी टीका केली असली, तरी जनसंघाने मात्र हिंदुसभेला कधीही शिव्याशाप दिले नाहीत. त्यांनी हिंदुसभेकडे पूर्ण दुर्लक्ष केले. कदाचित, पुढेमागे ही सगळी माणसे आपल्याच पक्षात येतील, अशी आशा त्यांना वाटत असावी.

५७ सालच्या निवडणुकांत हिंदुसभा व जनसंघ दोघांनाही थोडी धुगधुगी मिळाली. संयुक्त महाराष्ट्र समितीने 'मुंबई सकट संयुक्त महाराष्ट्राच्या ना-यांवर या निवडणुका लढवल्या. हिंदूसभा आणि जनसंघ दोन्हीही समितीचे घटक पक्ष होते. त्यामुळे समितीतील पक्षांना जे जागा-वाटप झाले, त्यात जनसंघाच्या वाट्याला लोकसभेच्या दोन जागा आणि विधानसभेच्या चार-पाच जागा आल्या. हिंदुसभेला मात्र पुण्यातील सदाशिव पेठेची एकमेव जागा देण्यात आली व तिथून केसरीचे संपादक जयंतराव टिळक यांनी निवडणूक लढवली. खरेतर ही जागा एस. एम. जोशी यांची होती. मागील विधानसभेवर ते इथून निवडून गेले होते. पण जयंतराव टिळकांनी हट्ट धरला व एस. एम. जोश्यांनी ती जागा हिंदुसभेला दिली. जयंतराव टिळक मोठ्या बहुमताने निवडून आले. एस. एम. जोशीही निवडून आले एस. एम. जोशी आमच्या घराच्या अगदी जवळच राहत असत. दादा गोखल्यांनी एस. एम. जोश्यांच्या घरापाशी सनईवाल्याला बोलवून सनई वाजविण्याचा कार्यक्रम केला. टिळक व एस. एम. जोशी यांच्या विजयाने त्यांना आनंदाचे भरते आले होते. रामभाऊ म्हाळगी तेव्हा मावळ मतदारसंघातून विधानसभेवर निवडून गेले.

नंतर पुणे महानगरपालिकेच्या (मनपा) निवडणुका आल्या. तेव्हा काँग्रेस इतकी गलित-गात्र झाली होती की, तिने निवडणुका लढवल्याच नाहीत. त्या वेळी

पुण्यातील 'सकाळ' हे वर्तमानपत्र 'नागरी आघाडी' नावाची एक संघटना बांधून निवडणूक लढवीत असे. अनेक काँग्रेसवाल्यांनी नागरी आघाडीत सामील होऊन निवडणुका लढवल्या. बरेच काँग्रेसवाले पक्ष बदलून समितीतही सामील झाले होते. त्यांचे पुढारी होते भाऊसाहेब शिरोळे. निवडणुकीत समितीचा प्रचंड जय झाला. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न इतका धगधगता होता की, त्या आधारावर कोणीही निवडून आले असते. त्यातच पुण्यातील 'प्रभात' दैनिकाचे संपादक वालचंद कोठारी आणि आचार्य अत्रे असे धडाकेबाज वक्ते समितीच्या प्रचारात होते. तेव्हा निकाल ठरलेलाच होता. माझ्या पाहण्यात तरी हे दिवस हिंदुसभेच्या चढत्या कमानीचे होते.

नंतर मात्र दिवस पालटले. समितीचा कितीही जय झाला असला तरी, त्या वेळच्या द्विभाषिक मुंबई राज्यात समितीची सत्ता आली नाही व तशी ती येणेही शक्य नव्हते. दरम्यान समितीतील पक्षांतही लठ्ठालठ्ठी चालूच होती. मुख्य भांडण कम्युनिस्ट पक्ष आणि प्रजासमाजवादी पक्ष यांच्यात होते. जनसंघाला संयुक्त महाराष्ट्र व्हावा याच्याशी देणेघेणे नव्हते; किंबहुना भाषावार राज्यरचनेचे तत्त्वच त्यांना मान्य नव्हते. निवडणुकीत फायदा मिळावा म्हणून जनसंघ समितीत सामील झाला होता. त्यामुळे प्रत्येक बाबतीत 'मेरी मुर्गी की एकही टांग' या पद्धतीने ते खेंगटी काढत असत. ५८ साली नेहरूंच्या हस्ते प्रतापगडावरील शिवाजीराजांच्या पुतळ्याचे उद्घाटन होणार होते. समितीने प्रतापगडाच्या मार्गावरून नेहरू जात असताना त्यांचा निषेध करण्याचे ठरवले. तो एक मोठाच कार्यक्रम झाला. पण जनसंघवाले त्यात सामील झाले नाहीत. त्यांचे म्हणणे की, प्रतापगडाच्या मार्गावर निदर्शने करण्यापेक्षा लोकांनी आपापल्या गावीच एकत्र येऊन नेहरूंचा निषेध करावा. 'विरोध नाही निदर्शनाला; तो तर केवळ स्थानाला!' अशी त्यांची घोषणा होती. अशा अपशकुनी जनसंघाची अत्र्यांनी प्रचंड थट्टा केली. हिंदुसभावाल्यांनाही 'बरी जनसंघाची फजिती झाली' असे समाधान वाटले.

साठ साली महाराष्ट्राची निर्मिती झाली. यशवंतराव चव्हाणांनी 'मंगलकलश' दिल्लीहून आणला आणि समितीत फाटाफूट झाली. प्रजासमाजवादी पक्ष आणि जनसंघ दोघेही समितीतून बाहेर पडले. 'समिती'ने आपले नाव बदलून 'संपूर्ण महाराष्ट्र समिती' असे नाव घेतले. कारण मुंबईसकट संयुक्त महाराष्ट्र झाला असला तरी बेळगांव, कारवार, निपाणी, डांग व भातलई वगैरे प्रदेश महाराष्ट्राच्या बाहेरच राहिले होते. ते मिळवण्यासाठी लढा चालूच ठेवला पाहिजे या आग्रहाखातर कम्युनिस्ट, शेतकरी कामगार पक्ष, लाल निशाण पक्ष, असे एकत्र राहून त्यांनी संपूर्ण महाराष्ट्र समिती चालू ठेवली. हिंदुमहासभा ही समितीतच राहिली. साठ साली पुण्याच्या महापौरपदाची निवडणूक आली. आता पुणे मनपात काँग्रेस हा मोठा पक्ष झाला होता. समितीकडून पहिले महापौर झालेले भाऊसाहेब शिरोळे आता काँग्रेसकडून पुन्हा महापौर पदासाठी उभे होते. समितीने हिंदुसभेचे वा. ब. गोगटे यांना उमेदवारी दिली. ही निवडणूक फार अटीतटीची आणि तणावपूर्ण झाली. निवडणुकीला जातीय रंग चांगलाच चढला होता. गोगट्यांना निवडून येण्याची अजिबात शक्यता वाटत नव्हती. त्यांनी प्रजासमाजवादी पक्ष आणि जनसंघ यांच्यापुढे भरपूर नाकदु-या काढल्या; आणि त्या पक्षांच्या नगरसेवकांची मते मिळविण्याची खटपट केली. भाऊसाहेब शिरोळे आणि गोगटे यांची जवळची ओळख होती. तेव्हा गोगट्यांनी भाऊसाहेबांशी एक करार केला. तो असा की, सभागृहात मतदानाच्या वेळी हुल्लडबाजी करू नये आणि निकाल जाहीर झाल्यावर गोगट्यांच्या मतदारांना धक्काबुक्की न करता सभागृहाबाहेर जाऊ द्यावे. निवडणुकीच्या दिवशी शहरभर तणावपूर्ण वातावरण होते. दादा गोखले यांचा अड्डा दिवसभर धावाधाव करून गोगट्यांची मते फुटणार नाहीत अशी दक्षता घेत होता. आणि काय आश्चर्य! गोगटे चक्क निवडून आले. दादा गोखल्यांनी संपूर्ण आळीत पेढे वाटले. मोठाच विजयोत्सव झाला!

या विजयामुळे खुद्द गोगटे आणि हिंदुसभा यांना उत्साहाचे भरते आले. ६२ सालच्या निवडणुकीत मुंबईत व्ही. के. कृष्णमेनन, त्या वेळचे संरक्षण मंत्री, यांच्या विरुद्ध आचार्य कृपलानी असा सामना उभा राहिला. त्या वेळी कम्युनिस्टांचा पाठिंबा मेनन यांना होता. त्यामुळे संपूर्ण महाराष्ट्र समिती मेनन यांच्या विरुद्ध उमेदवार

उभा करणार नाही, याची खात्री होती. अशा वेळेला वा. ब. गोगट्यांनी मुंबईतून लोकसभेच्या जागेसाठी अर्ज भरला! आता कम्युनिस्टांची म्हणजेच संपूर्ण महाराष्ट्र समितीची पंचाईत झाली. त्यांना 'मेननला मते द्या', असे म्हणता येईना. अशा वेळी समितीचे पुढारी श्री. अ. डांगे यांनी एक चातुर्यपूर्ण मुलाखत 'मराठ्यां' ला दिली. तीत त्यांनी असा युक्तिवाद केला की, कृपलानी हे प्रतिगामी पक्षांनी पाठिंबा दिलेले उमेदवार आहेत. त्यामुळे त्यांचा पराभव होईल, अशा पद्धतीने लोकांनी मतदान करावे. याचा अर्थ असा की, गोगट्यांच्या उमेदवारीमुळे मेननच्या मतांत घट होता कामा नये. शेवटी अर्थात व्हायचे ते झाले आणि मेनन जिंकले. गोगट्यांची हडप गडप झाली. दादा गोखल्यांच्या अड्ड्यावर हिंदुसभेचे नाना फडणीस मला म्हणाले, 'समिती कम्युनिस्टांच्या कचाट्यात सापडू नये म्हणून आम्ही ही एकाकी किंकाळी फोडली होती.'

पुण्यात त्या वेळेला सदाशिव पेठेत स. गो. बर्वे विरुद्ध रामभाऊ म्हाळगी असा सामना उगीचच अटीतटीचे स्वरूप देऊन जनसंघाने लढविला. बर्वे निवडून येणार ही काळ्या दगडावरची रेघ होती. पण जनसंघाने आपल्या नेटवर्कमधून अशा अफवा पसरवल्या होत्या की, बर्व्यांची बाजू डगमगती आहे. खरेतर बर्व्यांवर सदाशिव पेठेतील ब्राह्मण मतदारांचे फार प्रेम होते. गांधींच्या हत्येनंतरच्या दंगलीत बर्व्यांनी पुण्याचे कलेक्टर म्हणून ब्राह्मणवस्तीवर बाहेरून झालेले हल्ले थांबवण्याचे अथक प्रयत्न केले होते. नंतर पुणे मनपाचे पहिले आयुक्त म्हणून त्यांनी पुण्याची खूप सुधारणा केली होती. चिंचोळा असलेला लक्ष्मी रस्ता त्यांनी रुंद करून पुण्याला एक उच्च दर्जाचा बाजार मिळवून दिला होता. ६१ सालच्या पुरानंतर यशवंतराव चव्हाणांनी सर्वाधिकार देऊन बर्व्यांकडे पुण्याच्या पुनर्वसनाची कामगिरी सोपवली होती. निवडणुकीनंतर यशवंतरावांच्या मंत्रिमंडळात बर्व्यांकडे महत्त्वाचे खाते येणार, हे ठरल्यासारखेच होते. अशा स्थितीत रामभाऊ म्हाळगी यांना कोणी मते देईल, अशी शक्यताच नव्हती. तरी जनसंघाचे कार्यकर्ते रामभाऊंचा टिच्चून प्रचार करत होते. घरोघरी जाऊन, लोकांच्या हातापाया पडून रामभाऊंना मते द्या, अशा विनवण्या करत होते. निवडणुकीच्या दिवशी तर जनसंघाच्या स्वयंसेवकांनी कहर केला. चारचार वेळा घरांची दारे ठोठावून व लोकांची दुपारची झोपमोड करून 'मतदान केलेत का?' असा प्रश्न विचारण्याचा धोशा लावला. लोकांना मतदान केंद्रापर्यंत पोचवण्याचेही कष्ट घेतले. लोकांनीही केंद्रावर जाऊन बर्व्यांना मते दिली. निकालानंतर तेच स्वयंसेवक आपसात बोलत होते की, "आपण मतदारांना आणले नसते तरच बरे झाले असते. बर्व्यांची मते कमी झाली असती."

या वेळेला हिंदुसभेचे गणपतराव नलावडे समितीकडून याच मतदारसंघातून विधानसभेसाठी उभे होते. परिणामी रामभाऊच्या मतांत थोडीफार घट होण्याचा संभव होता. त्यामुळे जनसंघाने हिंदुसभेला उद्देशून 'शिवाजीचे जयसिंगास पत्र' म्हणून पत्रक काढले होते. जयसिंग आणि शिवाजी दोघेही हिंदू असताना जयसिंग शिवाजीचा घात करण्यासाठी लढत होता, त्याचप्रमाणे गणपतराव व रामभाऊ दोघेही हिंदुत्वनिष्ठ असताना गणपतराव रामभाऊच्या मतांत फूट पाडण्यासाठी उभे राहिले आहेत असा आशय. पुण्यातून लोसभेसाठी त्या वेळेला काँग्रेसतर्फे शंकरराव मोरे, समितीतर्फे आचार्य अत्रे, प्रजासमाजवादी पक्षाच्या तिकिटावर ना. ग. गोरे आणि जनसंघाकडून जनन्नाथराव जोशी उभे होते. शेवटचे दोघेही मोठ्या तोलाचे वक्ते होते. रामभाऊदेखील आवेशपूर्ण भाषणे करत असत. पण यशवंतरावांनी मंगलकलश आणल्यामुळे आणि विरोधी पक्षात फाटाफूट असल्यामुळे पुणे शहरात काँग्रेसचा पूर्ण जय झाला. आणि सर्व विरोधी उमेदवार- अगदी एस. एम. जोशीसुद्धा गारद झाले.

आमच्या अड्ड्यावरील हिंदुसभावाल्यांचे असे म्हणणे होते की, रामभाऊंनी निवडणूक लढविताना फार चुका केल्या. रामभाऊ आणि गणपतराव नलावडे या दोघांऐवजी गोगटे उभे राहिले असते, तर त्यांनी बर्व्यांचा हमखास पराभव केला असता; निदान जोराची टक्कर तरी दिली असती. कारण सभा-व्याख्यानातून मते मिळत नसतात तर निरनिराळ्या संस्थांतून व गप्पांच्या कट्ट्यांवरून ओळखी काढून मते मिळवावी लागतात; आणि त्यात गोगटे निष्णात होते. ही गोष्ट खरीच आहे की, त्या

वेळच्या पुण्यात अनेक ठिकाणी संध्याकाळच्या वेळी लोकांचे अड्डे जमत असत. पैसे खर्च न करता वेळ घालवायचा तो चांगला मार्ग असे. असो. गोगट्यांनी निवडणुकीसाठी मुंबई गाठली होती. तेव्हा त्या सा-या जरतरच्या गोष्टी होत्या.

(४)

तथापि गोगट्यांची महापौर म्हणून निवड हा हिंदुसभेचा पुण्यातील शेवटचाच विजय म्हणावा लागेल. या नंतर थोड्याच दिवसांत पुणे मनाच्या सदाशिव पेठ प्रभागाची एक पोटनिवडणूक उभी राहिली. त्या वेळी जनसंघाकडून शांताबाई लिमये उभ्या राहिल्या. हिंदुसभेकडून शांताबाई गोरे यांना उमेदवारी मिळाली होती. शांताबाई लिमये आमच्या जुन्या ओळखीच्या होत्या. त्या खरेतर साध्यासुध्या गृहिणी होत्या. त्यांचे पती दाजीबा लिमये यांचा अनोखाच व्यवसाय होता. ते यंत्राच्या साहाय्याने जमिनीतील पाणी शोधून काढीत. ते सारे कुटुंबच संघ आणि जनसंघाचे होते. शांताबाई गोरे ह्या एक जबरदस्त बाई होत्या. 'राणी लक्ष्मी मंडळ' नावाच्या संस्थेच्या त्या अध्यक्ष होत्या. शिवाजी मंदिर संस्थेतही त्या अधिकारी होत्या. मुख्य म्हणजे स्वातंत्र्यवीर सावरकरांवर त्यांची परम भक्ती होती. गांधीहत्येनंतरच्या दंगलीत नथुराम गोडसेंच्या घरावर दंगेखोरांनी हल्ला केला. घर जाळून टाकले. त्या वेळी गो-यांनी त्या सा-या कुटुंबाला आपल्या घरी आणून ठेवले. लोकांच्या दृष्टीने त्या अशा धाडशी बाई होत्या. ४९ सालच्या संक्रांतीला बाई चक्क अंबाल्याला गेल्या आणि त्यांनी नथुराम गोडसेला व इतर आरोपींना तीळगूळ नेऊन दिला. शिवाजी मंदिरात बाईंनी सावरकर सभागृह उभे केले होते. त्यामुळे दोन शांताबाईंच्या लढतीत शांताबाई गो-यांपुढे शांताबाई लिमये अगदीच किरकोळ होत्या.

आमच्या दादा गोखल्यांचा अड्डा ह्या मतदार संघात येत असल्यामुळे त्यांच्यावर गोरेबाईंना निवडून आणण्याची जबाबदारी होती. अड्ड्याचे सगळे सभासद आपली म्हातारपणे आणि व्याधी बाजूला ठेवून झटून कामाला लागले होते. घरोघरी फिरून ते शांताबाई गो-यांचा प्रचार करीत होते. लिमयेबाईंचा प्रचार जनसंघाकडून पद्धतशीरपणे चालला होता. ते प्रचारक तुलनेने तरुण होते. आणि संघातील स्वयंसेवक मुलेदेखील त्यांच्या तैनातीला होती. ब-याचदा ह्या दोन प्रचारक जथ्यांची गाठही पडत असे. आमचे हिंदुसभेचे लोक सांगत असत की, अशी गाठ पडे तेव्हा जनसंघाचे प्रचारक खजिल होत असत. आपण आपल्याच कुटुंबातील वडीलधा-यांशी भांडण करीत आहोत, असा अपराधीपणा त्यांच्य चेह-यावर दिसत असे. ते काही असो; पण शेवटी शांताबाई लिमये निवडून आल्या आणि गोरेबाईंचा पराभव झाला. त्यानंतर पुढे कोणतीच निवडणूक लढवल्याचे मला आठवत नाही.

माझा हिंदुसभेशी कोणताच संबंध नव्हता आणि जनसंघाशीही नव्हता. पण दोन्ही गोटांत माझ्या ओळखीची माणसे असल्याने काय चालले आहे, याची बरीचशी तपशीलवार माहिती मला मिळत असे. हिंदुसभेच्या लोकांविषयी मला थोडी कीव आणि बराच जिव्हाळा वाटे. एका हरवलेल्या कालखंडातील तेजाचे कण हातात धरून त्यातून पुन्हा हिंदुत्वाचा सूर्योदय करण्याची वेडी आकांक्षा बाळगणारी ही वर्तमान विसरलेली माणसे होती. त्यांचा 'नैसर्गिक शेवट होणार' असे मी वारंवार सांगत असे. आणि तसेच झाले, हिंदुसभा संपली ती पक्ष फुटून नव्हे किंवा पक्ष दुस-या पक्षात विलीन होऊन नव्हे, तर इमानदार कार्यकर्ते म्हातारे होऊन संपून गेल्यामुळे! ৩৩৩

# शोकात्म जीवन आणि सामंजस्य – २*

माणिक कानेड

(२)

जे जे रडवते, ते ते सर्व शोकात्म अशी ढोबळ समजूत असते. पण जे पाहून किंवा अनुभवून हसायला येईल, ते आनंदरूप समजून विनोदी किंवा सुखात्म मानता येईल का? हास्य भयानक, बिकट, खुनशी, विफल किंबहुना उदास आणि दुःखपूर्ण असू शकेल. सतत हसत ठेवणारे नाटक विषण्ण करू शकेल. रडतारडता हसविणारी किंवा हसताहसता रडविणारी किंवा मन दुःखाने भारून टाकणारी नाटके असतातच की. अश्रूंतून प्रसन्नता आणि हास्यातून विषण्णता अनुभवास येऊ शकते. सुखदुःखाला परस्परांची किनार असू शकते. अशा वेळी ती सुखदुःखात्मक (Tragi--Comedy) अशी संमिश्र मानून सोईस्कर सुटका करून घेता येईलही; परंतु तरीही गंभीर आणि विनोदी प्रकृतीच्या नाटकांचे मूलभूत रहस्य मात्र त्यामुळे उलगडणार नाही. आणि म्हणूनच की काय, सामंजस्याने तडजोड जुळवून किंवा पश्चात्तापाने दग्ध होऊन, स्वतःच्या दुःखाचा पेला डोळे मिटून प्यायचा असे मानून आपाततः सुखान्त दिसणारी नाटके बेधडक Comedies च्या सदरात लोटता येतील, असे मला वाटत नाही. शेवट गोड तर सर्वच सुखमय आणि शेवट करुण तर सर्वच शोकमय, अशी उथळ धारणा परिणामी आपत्तीत टाकणारी ठरेल. खरे म्हणजे मृत्यु आपण सर्वात दुःखदायक मानतो; परंतु कुणाचा, कसा, कशासाठी इत्यादी दृष्टींनी त्याचा विचार केला, तर मृत्यु सदासर्वकाळ दुःखदच असतो असे विधान करणे कठीण जाईल. अकिलिसचे Rumenides, सोफोक्लीसचे Electra, युरिपिडीसचे Alcestis वगैरे नाटके एका परीने सुखान्त आहेत. त्यांचा शेवट करुण नाही तरीही ती शोकात्म मानली जातात. सामंजस्य किंवा तडजोड हा कारुण्या वरील रामबाण उपाय ठरू नये. त्यामुळे सर्व समस्या सुटत नाहीत. आजच्या विचारधारेत तो एक इलाज सूचित होतो. डोक्यावर सुंठ लावावी; पण पोटातही दवा घ्यावी, तर मूळ वेदना नष्ट करता येईल, हेच खरे निदान असते. केवळ तडजोड करून समूळ कारुण्य नष्ट होऊन जीवन शोकात्म ठरणारच नाही, याची हमी देता येणार नाही. ते अंशतः खरे आहे. व्यक्तिपरत्वे काही पथ्ये पाळायची असतात. अनुपाने बदलायची असतात. आजच्या मध्यमवर्गाच्या विकारावर तो एक इलाज आहे. पण पुरातन ग्रीक समाजाची व्यथा काही निराळी असू शकेल. त्यांची लक्षणे वेगळी असू शकतील. त्याचा त्या काळच्या भूमिकेतून विचार झाला पाहिजे. म्हणूनच या ओघात सहज ओनीलच्या 'Beyond the horizon' ची मला आठवण होते. तसे पाहिले तर हे नाटक आधुनिकच आहे; तरीही त्यामुळे तडजोड किंवा सामंजस्य सार्वत्रिक-सार्वकालीन तोडगा नाही हा मुद्दा स्पष्ट होतो. आजच्या नाटकांचा विचार करताना तो एक विशेष म्हणून आपण त्याचा विचार करूच; परंतु त्याआधी शोकात्मिकांची मूळ कल्पना चांगली समजून घेतली पाहिजे. ओनीलचे वरील नाटक शोकात्म आहे. क्षितिजापलीकडील चिरंतन सौंदर्याकडे झेप घेणा-या काव्यमय आत्म्याला नियतीने कुरूप वास्तवतेत जखडून टाकल्याने जीवनाची शोकान्तिका झालेल्या अन्ड्रोमेयोची ही करुण कहाणी आहे. जे त्याचे नाही त्याच्याशी जुळवणी करूनही हतबल बनलेल्या, स्वप्नील काव्यमय जीवनसौंदर्याचा हव्यास असणा-या पण कठोर वास्तवतेत भग्न झालेल्या आत्म्याचा हृदयद्रावक अंत हा या नाटकाचा गाभा आहे. सम्यकत्त्वाच्या शोधार्थ **'विफल आशेच्या'** मागे धावल्याने सकृद्दर्शनी माणूस अयशस्वी ठरतो; पण त्यातच अन्तिम विजय अनुस्यूत असतो, हे सत्य हा या नाटकाचा आत्मा आहे.

* ***नवभारत*** मार्च १९६६ मध्ये प्रकाशित झालेला हा लेख पुनर्मुद्रित करत आहोत. फेब्रुवारी २०१६ मध्ये या लेखाचा पहिला भाग प्रकाशित झाला. हा दुसरा भाग आहे.

ओनीलच्या सर्वच नाटकांचा हा केन्द्रबिन्दू असतो. आधुनिक नाटककारांत गणना होत असूनही ग्रीकपरंपरेत रसरसलेले उदात्त आनंदमय जीवन कारुण्यातून साकार करणारा हा नाटककार आहे. शोकात्मिका हा शब्द ग्रीक नाटकांच्या संदर्भात कसा वापरला जातो हे प्रथम पाहून ती परंपरा आज टिकली आहे का, त्यांत काय व कसे स्थित्यंतर घडत गेले, आजच्या नाटकांना 'शोकात्मिका' म्हणताना काय बंधने येतात, यांचा विचार मांडण्याआधी ग्रीक शोकात्म नाटकांचे सम्यक्ज्ञान प्रथम करून घेतले म्हणजे आपले पुष्कळसे अपसमज तर दूर होतीलच; पण त्याचबरोबर आधुनिक शोकात्म व वैफल्यवादी नाटकांचा विशुद्ध दृष्टीने ऊहापोह आपणाला करता येईल. अर्थातच सर्व ग्रीक नाटकांचे विश्लेषण व समीक्षण या लेखाच्या मर्यादित प्रपंचात अशक्य आहे. काही प्रमुख वैशिष्ट्ये, दिशाभूल करणा-या काही ठरीव शंका व एकंदर सर्वसामान्य निष्कर्ष इत्यादींचाच विचार ठेवणे क्रमप्राप्त आहे. समीक्षणाच्या ओघात शेक्सपिअर-इब्सेन आदींच्या शोकात्मिकांचा प्रासंगिक उल्लेख करून आजच्या नाट्यापर्यंत त्यांची संगती वा विसंगती दर्शविण्याचा प्रयत्न करावयाचा आहे. आवाका फार मोठा आहे. म्हणूनच लेखातील विधानांचा पडताळा रसिकांनी स्वतः पारखून घ्यावयाचा आहे, संदिग्ध वा त्रुटित विधानांचा अन्वयार्थ स्वतःच समजून घ्यावयाचा आहे.

ग्रीक शोकान्तिकांच्या संबंधात प्रथम विचार येतो तो त्यामधील 'नियतीचा'. मग त्याला निसर्ग, दैव (fate) देव किंवा काही नैतिक-आध्यात्मिक शक्ती (Supernatural--moral Power) काहीही म्हणा; यांच्या समोर माणूस प्रसंगी उद्धत होत्साता विरोध करण्यास उभा ठाकला, तरी शेवटी त्याचा पराभव अटळ ठरून तो नमतो, ही प्रगाढ श्रद्धा या नाटकांच्या निर्मितीला कारणीभूत झालेली आहे, असे वाटते. एका बाजूला दणदणीत व्यक्तित्व असलेला माणूस त्याच्या श्रद्धा–निष्ठा–संकल्प–उद्दाम भूमिका आणि दुस-या बाजूला शाश्वत–सबल–नैतिक–उच्च आध्यात्मिक दुःसह सत्ता (सत्याचा साक्षात्कार) यांच्या संघर्षांतून निर्माण होणारे नाट्य ग्रीक शोकात्मिकांतून प्रत्यक्ष घडलेले दिसते. या संघर्षाचा कृतिशील आविष्कार घटनांच्या रूपाने रंगभूमीवर आकार घेतो. या संघर्षाचा शेवट अविनाशी सत्याच्या नैतिक विजयात आणि मानवाच्या पराभवात होतो. त्यामुळे मानवाचे शबल व्यक्तिमत्त्व शुद्ध व्हावे; नियतीसमोर–उच्च नैतिक सामाजिक मूल्यांसमोर त्याने नम्र व्हावे; त्याबद्दल त्याच्या अंतःकरणात भीतियुक्त आदरभाव वसावा, असेच दुर्भाग्य आपणांपैकी कोणालाही होणे शक्य आहे. या भीतीने, त्या समवेतच शोकनायकाविषयी हळहळ वाटावी आणि रसिकांच्या मनाचे शुद्धीकरण वा विरेचन होऊन त्यांना निरामय आनंद व्हावा, इत्यादी हेतूंनी ग्रीक शोकान्तिका परिपूर्ण आहेत. ग्रीक नाटकांत घटनांचे प्राबल्य असते असा रूढ समज आहे. 'Tragedy is the imitation of noble actions' असे ॲरिस्टॉटल म्हणतो. पण हे उदात्त कर्म, थोर व्यक्तिमत्त्व असलेला माणूस आणि त्याचे तितकेच उदात्त मन याविना आकाराला कसे येणार? म्हणूनच की काय, शोकनायकाचे थोर व्यक्तिमत्त्व आणि चिरंतन अजिंक्य नियति–वा उदात्त नैतिक मूल्यांनी अंकित परिस्थिती (सामाजिक वास्तवता) या घटकांचा शोकांतिकांच्या नियत घटकात समावेश करण्यात येतो. नियती अजिंक्य असेल, तिच्या चिरंतन सत्तेपुढे माणसाचा करुण शेवट होत असेल, सभोवतीची आक्रांत सामाजिक वास्तवता श्रेष्ठ ठरून शोकनायकाचा पराभव अटळ असेल; पण या संघर्षात शोकनायकाचे व्यक्तिमत्त्व थोर, उदात्त असणे अपरिहार्य असते. म्हणूनच तो केविलवाणी तडजोड करीत नाही की शरणागतीही पत्करत नाही. किंबहुना याच कारणासाठी त्याच्या पराभवातही विजयाची दीप्ती असते. त्याचा करुण शेवटही आनंदरूपच असतो. नायकाचे व्यक्तिमत्त्व थोर व उदात्त नसेल, तर तो नियतीच्या हातचे केवळ बाहुले बनेल; वास्तवतेच्या भोव-यात अगतिकपणे गरगरणारे तृणपाते ठरेल आणि अशा गतानुगतिक दुर्बल व्यक्तीचा पूर्वनियोजित (foreordained) शेवट केविलवाणा वाटेल, पण त्यातून कारुण्य कधीच निर्माण होऊ शकणार नाही. याच संदर्भात 'Destiny is character' – नियती म्हणजे स्वभाव – असे म्हटले असेल का?

सारांश, शोकात्मिकांचे विवेचन करताना प्रथम अस्मिता असलेला नायक– त्याचे स्वत्व– त्याच्या आत्मिक

श्रद्धा व संकल्प, उदात्त स्वभाव व सानुरोध श्रेष्ठ कर्म इत्यादींचा प्रथम विचार करून नंतर नायकाच्या उदात्त व्यक्तिमत्त्वाला छेद देणारी अंतिम सत्ता वा उच्च नैतिक वास्तवता आणि शेवटी या संघर्षातील जयापजयातून समुत्पन्न होणा-या नाट्याचा प्रभावरूप भावनात्मक परिणाम इत्यादींचा परामर्ष घेणे इष्ट ठरेल.

ग्रीक नाटकांतून अन्तिम सत्याचा साक्षात्कार साधावयाचा आणि जीवनाच्या पूर्णतेची अनुभूती द्यायची ही भूमिका असल्याने त्यांची घटनाप्रधानता मान्य करावी लागते. म्हणूनच आधी Plot (कथानक), मग (Character) पात्रे असा क्रम दिला जातो. ग्रीक नाटकांची कथावस्तू सामान्यतः नायकाने ईश्वरनिर्मित मूल्यांचे व समाजनिहत नीतिमत्तेचे जाणता वा अजाणता उल्लंघन केल्याने त्याच्यावर ओढवलेल्या दुर्धर पराभवांची घटनाप्रधान मालिका असते. यासाठीच की काय, प्रारंभी ग्रीक नाटके एकपात्रीच असत. ॲचिलिसने प्रथमच दोन व नंतर सोफोल्कीसने तीन पात्रे रंगभूमीवर आणली. हीच सर्व पात्रांच्या भूमिका करीत. या तुलनेत तमाशातील राधागौळण व सोंगाड्या कृष्ण यांची मला आठवण होते. नाटकात घटना पात्रांपेक्षा वरचढ दाखविल्याने त्यात सार्वत्रिक उच्च नीतिमत्तेची श्रेष्ठता, पापाचे प्रायश्चित्त व वेदनेतून आलेल्या आत्मज्ञानाच्या अन्तिम सत्तेवरील निःशंक श्रद्धेची परत प्रतिष्ठापना साधली जात असे. सामाजिक निष्ठांचा, मानवी मूल्यांचा भंग केल्याने परिणामतः दुःख भोगावे लागते हा ग्रीक शोकात्मिकांचा संदेश असे. तो समूहगीतांतून (chorus) बिंबविला जात असे. समूहगीतांचा ग्रीक नाटकांतील विलास मोठा मनोरंजक असून तो एक स्वतंत्र विषय होईल. सांगण्याचा मूळ मुद्दा हा की, पात्रे–भूमिका–स्वभाव–शील–व्यक्तिमत्त्व असा विकास क्रमाने होत गेला. स्वभाव (character) म्हणजे ('prospon'). याचा अर्थ 'रूपदर्शन'. एक मुखवटा घालून पात्र रंगभूमीवर वावरत असे. मग त्याचा स्वभाव एकच एक साचेबंद दाखविला जाई. हा ठोकळेबाज मुखवटा एकच भाव–एकच स्वभाव दर्शविणार. एखादे पात्र संतापी म्हणजे शेवटपर्यंत तसेच ही सुसंगती मानली जाई. यामुळेच या नाटकातील स्वभावपरिपोष एकमार्गी व अतिरंजित असा दिसतो. आजच्यासारख्या स्वभावाच्या सूक्ष्म व विविध छटा त्यात क्वचितच दिसत. (या विरोधात स्ट्रीन्डबर्गच्या Characterless पात्रांचा निर्देश मी करीन.) पुढे पात्राच्या स्वभावात 'Tragic flaw' असतो, असे मानले जाऊ लागले. यालाच 'hamartia' म्हणत, याचा अर्थ अतिरेक. 'hamartia' म्हणजे शोकप्रमाद, पण स्वेच्छेने जाणीवपूर्वक केलेला, सामान्यतः गुणांच्या अतिरेकांतून उद्‌भवलेला व शासनास पात्र ठरलेला. कर्मांने माणूस ओळखला जातो, तेच माणसाचे भाग्य वा दुर्भाग्य घडविते, हा बोध ग्रीक शोकात्मिकांतून होतो. ही शोकनायकाच्या स्वभावपरिपोषाची परंपरा लक्षात घेऊनही मी म्हणेन की, **शोकनायकाचे श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व शोकात्मिकांना अभिप्रेत आणि अपरिहार्य असते**.

मानवाची श्रेष्ठता आणि महत्ता यांवर विश्वास असल्याविना आपले स्वत्व गिळायला टपलेल्या, दुष्मन भासणा-या वास्तवतेशी संघर्ष फुसका ठरेल. जीवनातील आपत्तींची पूर्ण जाणीव ठेवून मानवाच्या प्रतिष्ठेवर, त्याच्या भावबलावर आणि अजिंक्य धैर्यावर निस्सीम श्रद्धा असल्याविना नायकाचा अन्त वा पराभव हा शोककारक वाटणेच शक्य नाही. कारुण्य आणि अक्षुण्ण अस्मिता अन्योन्याश्रयी आहेत. आपत्तीत नायकाच्या गुणांचा कस लागतो. ही सत्त्वपरीक्षाच त्याचे चारित्र्य पराभवातही उजळून टाकते. अिडिपसची उदात्त सत्यान्वेशी वृत्ती, अन्टीगनीची नैतिक सामाजिक मूल्यांवरील अढळ श्रद्धा, ऑथेल्लोची भव्य उत्कटता, हॅल्मेटची गंभीर विचारशील प्रगल्भता, त्या त्या नायकांचे अद्वितीय व्यक्तिमत्त्व निर्माण करतात, त्यांना असामान्य प्रतिष्ठा प्राप्त करून देतात आणि आपण सहज बोलून जातो– 'खरंच असे महान आत्मे विरळाच! अरेरे! यांचाही शेवट करुण व्हावा ना?' प्रत्येक शोकात्मिका मानवी जीवनावरील अढळ निष्ठा व्यक्त करते. जणू त्यातून आव्हान असते–परमेश्वर नसेना का स्वर्गात, या जगात माणूस तर आहे– तोही किती थोर! याच मानवी प्रतिष्ठेच्या–महत्तेच्या पोटी बाह्यतः पराभव पत्करूनही ॲन्टीगनी सिद्ध करते उच्च सामाजिक नीतिमूल्ये, मृत्यूला कवटाळूनही ज्युलिअट सिद्ध करते प्रेमाची दिव्य प्रेरक शक्ती, ऑथेल्लो छातीत खंजीर खुपसून घेतो पण डेस्डिमोना ही व्यभिचारी नव्हती हे कळल्यानंतर. तत्पूर्वी हे मानवी जग पापी ठरून धिक्कारमय

ठरले असते. आत्म्याच्या पावित्र्यापुढे–महानतेपुढे नायकाला मृत्यूही कःपदार्थ वाटतो. ऑथेल्लोचा भयानक आणि करुण शेवट पाहून प्रेक्षकांना काय वाटते? स्वतःच्या प्रमादाचे प्रायश्चित्त घेणारा ऑथेल्लो थोर नाही का? ज्योतीसारखी पवित्र आणि मोगरीसारखी निर्मळ असून डेस्डिमोनाचा हृदयद्रावक अन्त झाला याबद्दल आपणाला हळहळ वाटते. निर्मल मानवतेची करुण कथा आणि अलौकिक शूरांची वीरगाथा शोकत्मिकांतून गायिली जाते.

मानवाच्या महान प्रतिष्ठेचा दुसरा पैलू म्हणजे नायक स्वतःचा दुःखद शेवट स्वेच्छेने, आव्हानपूर्वक स्वतःच ओढवून घेत असतो. त्याच्या करुण शेवटास त्याची स्वतंत्र प्रज्ञा, बिजिगीशी भावना, प्रतिष्ठेची व कर्तव्याची जाणीव जबाबदार असते. त्याच्या अपरिवर्तनीय स्वभावातून, घडणा-या कृतीतून त्याचे पाऊल विनाशाकडे सरकत असते. अिडिपसच्या हातून त्याच्या बापाचा खून झाला आणि स्वतःच्या आईशीच नकळत त्याने लग्न केले. दैवी आपत्ती म्हणून कोसळलेल्या दुर्धर रोगाच्या तडाख्यातून आपल्या प्रजेला वाचविण्याच्या उदात्त मनीषेने पापाचा छडा लावण्यास तो सरसावतो. सत्य जाणून घेण्यास्तव वेडा झालेल्या अिडिपसाला त्याची पत्नीमाता Jocasta सांगते, "माणसाने दैवावर हवाला ठेवून निर्धास्त जीवन कंठावे. आईशी लग्न ही कल्पनाच तुला भयावह वाटते ना? अरे, अनेकांनी वैषयिक अभिलाषेने स्वप्नात तुझ्या आईशी रतिसमागम केला असेल. पण स्वप्न हे मिथ्या मानून जो जगतो, त्यालाच हे जीवन सुसह्य होते". परंतु व्यर्थ. त्याची जिज्ञासा, अस्मिता शेवटी आत्मघातास सामोरी जाते. निश्चिंत सुरक्षितता हा मानवाचा धर्मच नव्हे. 'He will not allow the Sleeping dogs lie' लोककल्याणासाठी स्वतःच्या जीवनाची वाताहत तो करून घेतो. संकटांना आव्हान तो स्वतःच देतो. शिकारही स्वतःच बनतो. चंद्र उलटून पाहिला नसता तर ज्वालामुखीची यात्रा घडती ना. पण स्वभावाला औषध नसते. असे झाले नसते तर! ही भाषाच येथे अप्रस्तुत ठरते. जीवनाशी केविलवाणी तडजोड त्यांच्या अभिमानाला मानवत नाही. 'घासला सहाणेवरती–ओकला लोळ आगीचे–रंगला यशाने त्याच्या असे ते दिलजान– असे भव्योदात्त स्वरूप त्यांचे. याच संदर्भात महत्त्वाकांक्षी मॅकबेथ, संशयी पण कृतिशील ऑथेल्लो, अतिविचारी पण कर्मशून्य हॅम्लेट इत्यादी नायकांच्या शोककारक प्रमादाची (Tragic flaws) उपपत्ती समोर येते. सद्‌गुण सुखाची हमी नव्हे किंवा दुर्गुण केवळ आपत्तीच ओढून घेतात असेही नव्हे. वेदनेतून आलेल्या विवेक, आत्मज्ञान उद्‌बोधक ठरून निर्वाणीचा आनंद प्रदान करील. ॲगमेनॉनमधील समूहगान पटविते, "दुःखाच्या आघाताने परमेश्वरी सत्तेचे अधिष्ठान मानवाच्या हृदयात ठसते."

ग्रीक नाटके सामाजिक वास्तवतेची प्रतिरूप न मानता सामाजिक उच्च, नैतिक मूल्यांचा यथातथ्य आविष्कार करणारी वास्तवप्रधान नाटके मानली पाहिजेत. व्यक्ती कितीही श्रेष्ठ असली तरी त्यापेक्षा समाज, नीतिमूल्ये, आध्यात्मिक दैवी सत्ता अधिक मोठी आहे. त्यासमोर माणूस वाकला पाहिजे, नम्र झाला पाहिजे– त्या महानतेची जाणीव होऊन त्याला आत्मज्ञान झाले पाहिजे व प्रायश्चित्ताने त्याचे जीवनाशी सुसंगत नाते जडले पाहिजे, ही भूमिका त्यात अनुस्यूत असते. माणूस समाजशील प्राणी आहे. समाज पूर्ण आहे–आदर्श आहे- - महान आहे. 'माणसाने कसे जगावे?' ह्याची मूल्ये समाजपुरुषात रुजलेली आहेत. माणसाचे शील समाज घडवितो. माणसाचे व्यक्तिमत्त्व समाजापेक्षा बरे नाही; मोठे तर नाहीच नाही. त्याचे स्वतंत्र अधिष्ठान उच्च सामाजिक ध्येय गाठण्याचे साधन आहे. आदर्श आणि श्रेष्ठ जीवन नागरिक जीवनाशी एकरूप असते, असा काहीसा बोध ग्रीक नाटकांतून मिळतो.

ग्रीक राज्ये लहानलहान नगरराज्ये होती. त्यांना 'Polis' म्हणत. या राज्यांतील प्रत्येक नागरिक त्याचा अविभाज्य असा घटक असे. मर्यादित जनसंख्येत प्रत्येक नागरिक सेनापती, शासक, सेवक नागरिक या विविध भूमिका अपरिहार्यपणे निभवीत असे. त्या प्रत्येकास तो पात्र असे. वैयक्तिक आणि सार्वत्रिक वा सामाजिक व सार्वभौम यांतील सीमारेषाच पुसून गेलेल्या असल्याने व्यक्तिगत सुख–उन्नती सामाजिक भरभराटीशिवाय अशक्य आहे, अशी त्यांची धारणा होती. समाज हे एक कुटुंब आहे. त्यातील प्रत्येक व्यक्ती भल्याबु-या परिणामांना जबाबदार आहे. धार्मिक अधिष्ठान असलेल्या नाटकांतूनही ही सामाजिक जाणीव प्रतीत झालेली दिसते. सामाजिक

